साहित्यसम्राट न. चिं. केळकरकृत

# चंद्रगुप्त



**चंद्रगुप्तः**—माझी प्रतिज्ञा खोटी ठरवून, दैवाला माझी फजिती तर करायची नसेल? [पृष्ठ २७]

**किंमत २ रुपये**

# चंद्रगुप्त नाटक

लेखक

रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए. एल्‌एल्. बी.
केसरी व मराठा पत्रांचे संपादक
आणि
' तोतयाचें बंड ' ' कृष्णार्जुन युद्ध ' ' वीर विडंबन '
' पतीची निवड ' इत्यादि नाटकांचे कर्ते

— प्रकाशक —

बलवन्त पुस्तक भाण्डार,
गिरगांव नाका, मुंबई नं. ४.

बलवन्त प्रकाशन
गिरगांव मुंबई
क्रमांक २०

आवृत्ति चवथी

गुढी पाडवा,
शके १८७३

एप्रिल, १९५१

किंमत २ रु

# प्रस्तावना

भक्ति ही मनुष्यमात्राच्या आवडीवर अवलंबून असते, मग ती देवाची असो किंवा राजाची असो. अशा अर्थाचें वाक्य या नाटकांतील एक प्रमुख पात्र चंदनदास याचे तोंडीं तिसऱ्या अंकांत आलें आहे; हीच या नाटकाची मध्यवर्ती कल्पना होय. ह्यांत 'मुद्राराक्षस' नाटकामुळें परिचित झालेल्या कांहीं भूमिकांना स्कॉटच्या 'वुडस्टॉक' नामक एका कादंबरींतील कांहीं भूमिकांची जोड दिलेली वाचकांस आढळून येईल.

या नाटकाचा प्रथम प्रयोग पुणें येथें ता. १५ जुलै १९१३ रोजीं 'किर्लोस्कर संगीत नाटकगृहांत' झाला.

या नाटकाचा प्रयोग बसवून तें लोकांपुढें आणण्याच्या कामीं 'चित्ताकर्षक नाटक मंडळी'नें जो उत्साह दाखविला व जी मेहनत घेतली तिजबद्दल मी सदरहु मंडळीचा आभारी आहें.

पुणें, कार्तिक शुद्ध प्रतिपदा, शके १८३५
गुरुवार ता. ३० आक्टोबर सन १९१३.

नरसिंह चिंतामण
केळकर

## चंद्रगुप्त नाटकांतील मुख्य पात्रें

**चंद्रगुप्त**—मगध देशाचा राजा व धननंद राजाचा ज्येष्ठ पुत्र.

**चाणक्य**—चंद्रगुप्ताचा गुरु.

**चंदनदास**—धननंद राजाचा इमानी मित्र.

**बळिराम**—चाणक्य व चंदनदास यांचा सहाध्यायी मित्र.

**हरनंद**—धननंद राजाचा कनिष्ठ पुत्र.

**माधव**—चंदनदासाचा पुत्र.

**भागुरायण**—चंद्रगुप्ताचा सेनापति.

**वीरसेन**—चंद्रगुप्ताचा उपसेनापति.

**कांतिवर्मा**—आनंदभुवनाचा एक रहिवासी व चंदनदासाचा आश्रित.

**व्यातिपात**—कांतिवर्म्याचा मित्र.

**तारिणी**—चंदनदासाची मुलगी.

**लवंगी**—आनंदभुवनांतील एक दासी.

### नाटकांतील मुख्य स्थळें

**पाटलीपुत्र शहर व आनंदभुवन.**

# कै. नरसिंह चिंतामण केळकर

**मला जन्मा येतां तनुभरणकार्यी कण-कण**
**दिलें पांचां भूतीं परत करणें तें निजऋण।**
**तदाधारें सौख्यें सतत जगलों, तें मज पुरे**
**तनुत्यागाऐसा इतर अनृणा मार्गचि नुरे॥**

गेल्या चार तपांच्या साहित्यसेवेच्या व्रताची परिसमाप्ति, साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांनीं प्रस्तुत कवितेनें केली. 'हांके'ची वाट पाहणाऱ्या ह्या भीष्माचार्यानें इच्छामरण मिळवून मृत्यूवरहि मात केली यांत शंकाच नाहीं. वर दिलेल्या ओळी त्यांच्या संतुष्ट जीवनाचें सार सांगणाऱ्या आहेत.

कै. तात्यासाहेबांचा जन्म १८७२ मध्यें, ऑगस्ट महिन्यांत २४ दिनांकाला पंढरपूरजवळच्या मोडनिंब गांवीं झाला. चिंतोपंत दादा हे केळकरांचे वडील. केवळ उपजत बुद्धिमत्तेच्या बळावर ते मिरज संस्थानांत मामलेदाराचे हुद्द्या-पर्यंत चढले. त्यांच्या पत्नीचें नांव यशोदाबाई. अतिशय कष्टाळू आणि मनमिळाऊ असा तिचा स्वभाव. तात्यांचें वैभव, मानमतराब तिनें पाहिला. ८३ वर्षांची होऊन ती १९२६ सालीं वारली. वयाच्या पंधराव्या वर्षी तात्यासाहेबांचा विवाह झाला. त्यांच्या पत्नीचें नांव दुर्गाबाई. त्यांना केळकर घरचा धर्मगुरु (बिशप) म्हणत आणि त्यांच्या धार्मिक बाबतींतल्या आज्ञा मानीत. बुद्धिप्रामाण्यवादी केळकर पत्नीसंबंधीं म्हणतात, "माझा जो उत्कर्ष झाला आणि कौटुंबिक सुस्थिति लाभली तिला कारण माझी बायको आहे. अशा कामीं पायगुण म्हणतात तो खरा असेल तर तो तिचा आहे अशी माझी भावना आहे खरी."

केळकरांचें मराठी नि इंग्रजी शिक्षण मिरजेंत झालें. वर्गांत त्यांचा क्रमांक पहिला किंवा दुसरा असे. व्याकरण आणि गणित हे त्यांचे नावडते विषय; परंतु भाषा-इतिहास इत्यादि विषयांमधील प्राविण्यामुळें ते आपला क्रमांक टिकवूं शकत. इंग्रजी शाळेंत कै. वासुदेवशास्त्री खरे हे त्यांचे एक शिक्षक होते. त्यांनीं एकदां संस्कृत श्लोकरचनेची चढाओढ ठेवली होती, तींत केळकर पहिले आले. "सामान्य बी. ए. मनुष्य असे श्लोक करूं शकणार नाहीं" असें म्हणून खरेशास्त्र्यांनीं त्यांची पाठ थोपटली. मिरजेचें वाचनालय

यथातथाच होतें, त्यामुळें कथापुराणें ऐकणें, गुरुचरित्र, पांडवप्रताप इत्यादि पोथ्या वाचणें यांतून अंगीं बहुश्रुतपणा येईल तेवढाच. १८८८ सालीं त्यांची मॅट्रिकची परीक्षा उतरली.

त्यांचें महाविद्यालयीन शिक्षण कांहीं कोल्हापूरला पण बरेंचसें पुण्यांत फर्ग्युसन व डेक्कन कॉलेजांत झालें. त्या काळांत आपटे, गोखले, टिळक, आगरकर ह्यांसारखे नामवंत प्राध्यापक त्यांना लाभले. या काळांत वाचनापेक्षां क्रिकेट, टेनिस, बोटिंग यांतच केळकरांचा अवांतर वेळ खर्च होत असे. कॉलेजांत संमेलनप्रसंगीं 'मृच्छकटिक' नाटकांत स्त्री-भूमिकाही त्यांनीं केली होती. १८९१ सालीं केळकर बी. ए. झाले. पुढें एम्. ए. ला जावें, असें स्वतःचें मत; रीतसर नोकरी धरावी, हें वडिलांचें मत; आणि वकील व्हावें, हें बंधूंचें मत — यांत बंधूंच्या मताचा वरचष्मा होऊन केळकर एल्एल्. बी.च्या अभ्यासासाठीं मुंबईस क्लब करून राहिले. त्या क्लबांत विनोदाचार्य कै. कोल्हटकर हेहि होते. त्या वेळच्या जीवनक्रमाविषयीं केळकर म्हणतात, "कायद्याचा अभ्यास नाइलाज म्हणून करावयाचा ... आपलें औषध आपणच घ्यावें व तोंड वांकडें करावें लागलें तर तें दुसऱ्या दाखवूं नये अशी कायद्याच्या अभ्यासाविषयीं आमची भावना होती. खरें प्रेम काय तें गायन, वाङ्मय व नाटक ह्यासंबंधाचेंच असे" ... दुसऱ्यास प्रयत्नास कां होईना, केळकर पहिल्या एल्एल्. बी. च्या परीक्षेंत नुसते उत्तीर्ण झाले नव्हे तर पहिल्या वर्गांत आले आणि वर ५० रुपयांचें पारितोषिकहि त्यांनीं पटकावलें. पुढें शिक्षकाची नोकरी करत असतांनाच त्यांनीं दुसऱ्या एल्एल्. बी. ची परीक्षा दिली.

वयाच्या २३ व्या वर्षीं केळकर साताऱ्यास वकिली करूं लागले. लेखक, व्याख्याता, टेनिस खेळाडू म्हणून साताऱ्याच्या सार्वजनिक जीवनांत त्यांचा प्रभाव पडूं लागला. पण साताऱ्याऐवजीं पुणें आणि वकिलीऐवजीं जनतेची वकिली– पत्रपांडित्य – त्यांच्या भाळीं लिहिलेलीं होतें. 'लॉ क्लास व मराठा पत्र चालविण्यास योग्य' असा सहकारी म्हणून लो. टिळकांनीं १८९६ त केळकरांना जवळ केलें– आणि तें कायमचें च. दडपशाहीचा वरवंटा ओलांडून आणि आर्थिक अडचणींची गर्त चुकवून केसरी-मराठ्यांच्या रथांतून लो. टिळकांच्या जहाल राजकारणाचें सारथ्य करावयाचें, म्हणजे काय साधी गोष्ट होती! सतीचें वाण होतें तें! त्यांत दोन वेळां टिळकांना शिक्षा झाली तेव्हां

तर सारेंच दायित्व केळकरांवर पडलें. पण त्या अत्यंत कसोटीच्या काळांतहि केळकर यशस्वी रीतीनें तावून सुलाखून निघाले. इतके कीं, कांहीं मतभेदामुळें केळकर त्यागपत्र देऊं लागतांच लोकमान्यांनीं हृदयाला पीळ पाडणारें पत्र लिहिलें. ते म्हणतात, "...तुम्हांला ईश्वराची शपथ आहे ! तुम्ही सोडून जाणार याहून अधिक दुःखद गोष्ट मला दुसरी वाटत नाहीं. **आतां माझ्या जागीं तुम्ही क्रमानें आलां आहां.**" केळकरांविषयीं लोकमान्यांना वाटत असलेला केवढा विश्वास हा ! केळकरांच्या योग्यतेचा, तोलामोलाचा अधिक उत्कृष्ट पुरावा दुसरा कोणता असूं शकेल ?

१९२० च्या १ ऑगस्टला लोकमान्य दिवंगत झाले. महाराष्ट्राच्या पुढारीपणाचा कांटेरी मुकुट 'क्रमानेंच' केळकरांच्या मस्तकीं चढला. अखिल भारतीय राजकारणांत गांधीजींची छाप अधिकाधिक पडत चालली होती. केळकरांना गांधीवादांतील अव्यवहार्य तत्त्वें कधींच संमत झालीं नाहींत. १९२३ सालीं नेहरू, दास यांच्या मदतीनें स्वराज्यपक्ष स्थापून आणि नंतर प्रतिसहकार–पक्ष, लोकशाही स्वराज्य–पक्ष, हिंदुमहासभा ह्या संस्थांचें नेतृत्व करून त्यांनीं गांधीवादाला विरोध करून प्रतियोगी सहकाराचें टिळकतत्त्व जिवंत ठेवण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला. गांधीवादाच्या इंद्रजालामुळें फसून टिळकांच्या काळांतले खाडिलकर– परांजपे– देशपांडेप्रभृति मी मी म्हणणारे पुढारी सत्य–अहिंसेच्या लोंढ्याबरोबर वाहत गेले, पण केळकर मात्र एखाद्या प्रचंड वृक्षाप्रमाणें अचल राहिले. वीर सावरकरांच्या विजनवासांत, शमीवृक्षावरील पांडवीय शस्त्रांप्रमाणें हिंदुत्वाची आणि टिळक–तत्त्वाची त्यांनीं जपणूक केली; आणि तीहि सरकारी अवकृपेची आणि स्वकीयांकडून झालेल्या मानखंडनेची तमा न बाळगतां ! आज राष्ट्रीय सभेचे नेतेहि 'आम्ही अधिकारपदें सोडणार नाहीं' असें म्हणूं लागले आहेत, पण हे वेद वदविणारे 'ज्ञानेश्वर' म्हणजे केळकरच होत.

हिंदुसभा, संस्थानी परिषद, महाराष्ट्र साहित्य–संमेलन इत्यादि अनेक संस्थांचीं अध्यक्षपदें त्यांनीं भूषविलीं. वर्तुळ परिषद, मध्यवर्ति विधिमंडळ, नगरपालिका यांतील त्यांची कामगिरी उल्लेखनीय आहे. त्यांच्या सुवर्णमध्य साधण्याच्या हातोटीमुळें लवाद म्हणून त्यांनीं केलेली कामगिरी लोकादरास पात्र झाली. महाराष्ट्र–कर्नाटक वाद आणि पर्वती मंदिर–प्रवेश हीं दोन

उदाहरणें लक्षांत घेण्यासारखीं आहेत. त्यांच्या स्वभावाला बोंचक धार नसल्यामुळें विरुद्ध पक्षाचे लोकहि त्यांचे अखेरपर्यंत मित्र राहिले.

'संपादकांत गणना पहिली जयाची' असे सर्वश्रेष्ठ संपादक, राजकारणाचे कुशल टीकाकार, चरित्रकार, इतिहास-लेखक, कादंबरीकार, नाटककार, वाङ्मयीन मीमांसेचे मूलाधार अशा अनेक नात्यानें केळकरांनीं बहुरंगी आणि बहुगुणी वाङ्मय निर्माण केलें आहे. त्यांच्या वाङ्मय-रत्नसमूहांत निबंधाची योजना कौस्तुभमणीचे ठायींच करावी लागेल. निबंध-वाङ्मयांत त्यांचा विक्रम आहे. व्यासंग, युक्तिवाद, धराऊ उपमा-दृष्टांत, आकर्षक मथळे, सुभग रचना आणि नर्म विनोद हे त्यांच्या लेखनशैलीचे विशेष आहेत. त्यांनीं एकंदर आठ नाटकें लिहिलीं त्यांत "तोतयाचें बंड; चंद्रगुप्त आणि **कृष्णार्जुन युद्ध** हीं तीन नाटकें वाङ्मयांत ध्रुवपद मिळवण्याच्या योग्यतेचीं आहेत" असें मत डॉ. वि. पां. दांडेकर यांनीं व्यक्त केलें आहे. टिळक-चरित्र, मराठे व इंग्रज, हास्यविनोद-मीमांसा, ज्ञानेश्वरी-सर्वस्व, गतगोष्टी, भारतीय तत्त्वज्ञान हे त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. १९३८ सालीं त्यांच्या ६१ व्या वाढदिवसाचे निमित्तानें महाराष्ट्रभर त्यांचें अभिनंदन झालें आणि त्याचवेळीं १२०५० पृष्ठांचें 'समग्र केळकर वाङ्मय' बारा खंडांत प्रसिद्ध करण्यांत आलें. पण या साहित्यसम्राटानें त्यानंतरहि इतकें साहित्य निर्माण केलें आहे कीं त्या 'समग्र' शब्दाला कांहीं अर्थच उरलेला नाहीं. घोड्यावर आरूढ झालेला असतांच एखाद्या सेनापतीला सौभाग्याचें मरण यावें, त्याचप्रमाणें लेख लिहितां लिहितां, कविता करून मृत्यूला संतोषानें आवाहन करतां करतां तात्यासाहेबांना मरण आलें! 'जगावें तात्यांसारखें आणि मरावें पण त्यांच्याचसारखें' असे एका साहित्यभक्तानें उद्गार काढले, ते किती सार्थ आहेत!

निसर्गाच्या देणग्या कमी असणारा माणूसहि व्यासंग आणि सदभिरुचीच्या जोरावर प्रथम-श्रेणींत कसा येऊं शकतो ह्याचें केळकर हें एक अत्यंत उद्-बोधक असें उदाहरण आहे. 'Genius is infinite capacity to take pains' ही मॅथ्यू ऑर्नोल्डची व्याख्या कै० तात्यासाहेबांच्या बाबतींत सर्वतोपरी लागू पडते!

**स. गं. मालशे,** M. A.

॥ श्री ॥

# चंद्रगुप्त नाटक.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

स्थळ—पाटलीपुत्र, दरबारच्या दिवाणखान्यासमोरची देवडी.

[ राजसेवक पहारा करीत आहे. बळिराम प्रवेश करतो व दरवाजानें आंत जाऊं लागतो. ]

**राजसेवकः**—कोण रे तो गोसावी ? तिकडं कुठं चालला ?

**बळिरामः**—तिकडं कुठं म्हणजे ? राजवाड्यांत.

**राज०ः**—राजाज्ञेशिवाय मी कोणालाही आंत सोडणार नाहीं.

**बळि०ः**—नव्या राजाबरोबर नोकरही नवेच दिसतात! काय, राजवाड्यांत झालं म्हणून मला प्रतिबंध ?

**राज०ः**—होय. तूं झालास म्हणून काय झालं ? आलास तसा परत जा.

**बळि०ः**—अरे वः ! असा हा प्रतिबंध कधींपासून झाला ? नंदराजाच्या वेळीं कसं उत्तम होतं ! राजवाड्याच्या एका दरवाजांत शिरून दुसऱ्या दरवाजांतून कोणीं चोरानंही खुशाल निघून जावं घाऱ्यासारखं. कुणी कुणाला विचारीत नव्हता !

**राज०ः**—आणि अशा अव्यवस्थेचं फळ नंदांनीं भोगायचं तें भोगलंच. आतां तो प्रकार उरला नाहीं. आतां राजाज्ञेशिवाय मुंगीचाही राजवाड्यांत प्रवेश होणार नाहीं; समजलास ?

**बळि०ः**—पण माझ्यासारख्या यात्रेकरू गोसाव्याला प्रतिबंध करावयाची राजाज्ञा तुला खचित नसेल. जाऊं दे बाबा, मला राजवाड्यांतल्या उमामहेश्वराच्या देवळांतल्या मूर्तीचं दर्शन घ्यायचं आहे.

राज०:–तेंही होणार नाहीं. नुसतं देवदर्शनाला जायचं असलं तरी या वेळीं मी सोडणार नाहीं. आर्य चाणक्यांच्या आज्ञेवरून राजसभा आतां इतक्यांतच भरायची आहे. या वेळीं तरी राजवाड्याच्या मार्गांत मला गर्दी होऊं देतां कामा नये. जा बाबा, फिरून केव्हां तरी ये. नाहीं तर राजाज्ञा घेऊन ये.

बळि०:–( हंसून ) बरं आहे बाबा ! तूं नाहीं सोडीत तर नको सोडूं आंत. काय पहा ! मीं नवा राजासुद्धां अजून पाहिला नाहीं डोळ्यांनीं. मग मला राजाज्ञा कशी मिळणार ? एरव्हींच मला जातां आलं तर पहातों. मला या राजवाड्याचे गुप्त मार्ग इतके चांगले माहीत आहेत, कीं माझे डोळे बांधून जरी मला सोडलं तरी मी ते सारे फिरून येईन. राजवाड्यांत तूं माझा प्रवेश होऊं न दिलास, तरी राजसभा आतां इतक्यांत भरणार आहे ही वार्ता तूं मला सांगितलीस, हे तुझे माझ्यावर मोठे उपकार झाले. ही राजसभा मला पाहिलीच पाहिजे. नंदांच्या वेळच्या राजसभा आणि प्रस्तुतची ही चंद्रगुप्ताची राजसभा यांत सरस नीरस कसं काय दिसतं हें मला पाहिलंच पाहिजे ! बैस बरं बाबा तूं खुशाल राजद्वार राखीत ! मुंगी-बिंगीचा कुठं चुकून प्रवेश होईल कीं काय पहा. राजसभेचा देखावा पहायला मी तर चाललोंच गुप्त मार्गानं. [ जातो. ]

राज०:–( हंसून ) निःस्पृह माणसं विक्षिप्त असतात असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं ! [ जातो व पडदा पडतो. ]

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—पाटलीपुत्र नगरच्या राजवाड्यांतील सभामंडप.

[ मध्यभागीं उच्चासनावर आर्य चाणक्य बसला आहे. उजवीकडे राजा चंद्रगुप्त नम्रपणें उभा आहे. डावीकडे सरदार, शिपाई वगैरे दूर उभे आहेत. ]

चाणक्यः–चंद्रगुप्ता, कुसुमपूरच्या लढाईचं वर्णन ऐकून माझं मन कसं समाधान पावलं. शाबास, शिष्य असावा तर असाच असावा. तूं आपल्या पराक्रमाची शर्थ केलीस.

चंद्रगुप्तः—गुरुमहाराज, माझा कसला पराक्रम? सर्व पराक्रम आपल्या कृपेचा! सर्व यश आपल्या आशीर्वादाचं! सर्व पुण्य आपल्या चरण-कमलांचं! मी काय, निमित्तमात्र झालों.

चाण०:—चंद्रगुप्ता, कामगिरी जशी थोर तसं निमित्तकारणही थोरच असावं लागतं. मी अभिमानानं किंवा गर्वानं बोलत नाहीं. पण श्रीकृष्णाला झालं तरी, अर्जुनासारखा लोकोत्तर वीर हातीं धरतां आला, म्हणूनच कौरवकुलाचा संहार करण्याचं दुष्कर कृत्य त्याच्या हातून पार पडलं. एरव्हीं श्रीकृष्ण झाला तरी काय करता? पण तें असो. कुसुमपूरच्या लढाईत नंदांकडचं किती सैन्य पाडाव झालं?

चंद्र०:—महाराज, कमींत कमी दहा हजार. नंदपक्षपाती सर्व प्रमुख लोकांचीं शिरकमलं कुसुमपूरच्या प्राकाराच्या आंत सांपडलीं. फक्त कुमार हरनंदाबरोबर जीं एक दोन माणसं रणांगणांतून पळून गेलीं, त्यांच्याशिवाय नंदांच्या सैन्यांतील एकही सैनिक जिवंत उरला असेल असं मला वाटत नाहीं.

चाण०:—(आश्चर्यानें) काय म्हटलंस? हरनंद रणांगणांतून जिवंत पळून गेला? (रागानें) चंद्रगुप्ता, हें तूं प्रथमच कां बोलला नाहींस? मीं तुझ्या पराक्रमाची व्यर्थ स्तुति केली. नंदकुळापैकीं एकच राजकुमार का होईना, पण तो जिवत राहिला तर नंदांच्या सैन्यांतील हजारों सैनिक तूं मारलेस तरी त्याचा काय उपयोग? तूं ती व्यर्थ हत्या मात्र केलीस. तूं फुकट पापाचरण केलंस, असंच मी तरी म्हणणार! तुझ्या पराक्रमाची मला मुळींच किंमत वाटत नाहीं. बोल! तूं हरनंदाला रणांगणांतून जिवंत कसा जाऊं दिलास?

चंद्र०:—महाराज, क्षमा करा. मी कुणाही नंदकुमाराला जिवंत कसा जाऊं देईन? इतर राजपुत्रांशीं लढून त्यांना मीं रणांगणांत लोळविलं. तोंच इतक्यांत हरनंदही अखेरच्या हल्ल्यांत वार लागून ठार झाल्याची बातमी माझ्या कानीं आली. पण युद्धसमाप्तीनंतर नंदकुळांतील सर्व पुरुषांचीं प्रेतं हुडकून काढून एकत्र केलीं. तेव्हां हरनंदाचं प्रेत मात्र सांपडलं नाहीं. एवढ्यावरूनच मला अशी शंका आहे, कीं तो चुकून जिवंत पळून गेला असावा. पण त्याचा पिच्छा मीं अजून सोडला नाहीं.

मीं यापूर्वींच चारही दिशांनीं आपले दूत धाडले आहेत. ते लवकरच हरनंदाला जिवंत किंवा मेलेला धरून आणतील असा मला भरंवसा आहे. आपण याविषयीं मुळींच चिंता करूं नये. ( दूत प्रवेश करतो. ) कायरे ? हरनंदाविषयीं तुला कांहीं बातमी समजली आहे काय? असेल तर बोल लवकर.

दूतः—होय महाराज ! मला बातमी लागली आहे. पण ती चांगलीशी नाहीं.

चाण०ः—चांगली आणि वाईट, तुला त्याचं काय? तूं आपलं काम कर. बोल लवकर काय बातमी असेल ती.

दूतः—माझी बातमी अशी आहे, कीं अखेरच्या हल्लयाच्या गर्दीत हरनंदमहाराज—

चाण०ः—अधमा, महाराज कुणाला म्हणतोस? थांब, तुझी जिव्हाच छेदून टाकली पाहिजे. ज्या पदावरून या चाणक्यानं नंदांना मृत्युपाश घालून ओढून काढलं, तें पद तूं यःकश्चित् सैनिक त्यांना तोंडच्या शब्दांनीं परत देणार वाटतं ?

दूतः—( पायां पडून ) अपराधाची क्षमा व्हावी. अखेरच्या हल्लयांत हरनंद जखमी होतांच सैनिकांनीं त्याला तटाच्या आश्रयाला नेलं. तेव्हां 'हरनंद पडला'—'हरनंद पडला'—अशी सैन्यांत एकच हाकाटी उठली ! थोड्याच वेळानं एक तरुण स्त्री एका बौद्धधर्मी श्रमणेचा हात धरून दुःखानं रडत व विलाप करीत आमच्या सैन्यापुढून जाऊं लागली. तिला अडविण्याचं सैनिकांच्या मनांत होतं. पण युद्धांत कोणाही स्त्रीला यत्किंचित्‌ही उपद्रव देऊं नये अशी महाराजांची आज्ञा होती, म्हणून त्या दुःखी स्त्रीला अडवून अधिक दुःखी करण्याला कोणाचेंच मन घेईना. कांहीं वेळानं हरनंद स्त्री-वेष घेऊन पळून गेला अशी बातमी आली. तेव्हां आपल्या डोळ्यांसमोरून पूर्वी गेलेली तरुण स्त्री तीच कपटवेषधारी हरनंद अशी त्यांची खात्री झाली. पण मग काय उपयोग !

चंद्र०ः—काय म्हटलंस ? हरनंद कपटवेषानं पळून गेला ?

चाण०ः—अरेरे ! काय करूं ? चंद्रगुप्ता ! तुझ्या सैनिकांचा हा नादानपणा पाहून माझ्या अंगाची कशी आग होते. नंदांच्या या कपटी पोराचें

यांना असं फसवावं ? धिक्कार चंद्रगुप्ता, तुला आणि तुझ्या सैनिकांना. यांच्या तरवारी बोथट झाल्या—त्या कोंवळ्या पोराचं काळीज यांच्या तरवारींना चिरतां आलं नाहींच—पण त्यानं कातणीच्या घरासारखं कपटाचं क्षुद्र जाळं विणलं तेसुद्धां यांच्या बोथट बुद्धीला तोडतां आलं नाहीं ना ? धिक्कार धिक्कार तुम्हां सर्वांना ! नंदवंशांतला एकच राजकुमार का होईना, पण तो जिवंत राहिला तर माझी प्रतिज्ञा खरी कशी ठरणार ? माझी प्रतिज्ञा—या चाणक्याची प्रतिज्ञा—अक्षरशः खरी झालीच पाहिजे. एऱ्हवीं प्रतिज्ञा केली काय आणि न केली काय सारखीच ! मी जिवंत राहिलों काय किंवा न राहिलों काय सारखाच !

चंद्र०:—महाराज, गुरुचरणापाशीं माझी थोडी विनंति आहे. हरनंद जिवंत पळून गेल्याबद्दल इतका चित्तक्षोभ होऊं देण्याचं फारसं कारण नाहीं. लढाईच्या गर्दींत हरनंदाला जिवंत पळून जातां आलं असेल, पण तेवढ्यानं त्याला अमर होऊन स्वर्ग जिंकतां आला असं नाहीं. हरनंद पृथ्वी फोडून थोडाच जाणार आहे ! रणांगणांत एकवटलेल्या सैनिकांच्या हातून त्याला निसटून जातां आलं तरी, सर्व राज्यभर पसरणाऱ्या माझ्या हेरांच्या हातून सुटून जाणं हें कर्म त्याला कठिण आहे. गुरुमहाराजांनीं चित्त स्थिर करावं. लवकरच हरनंदाचं शिर आणून आपल्या पायांपाशीं हजर करीन.

चाण०:—छेः ! ती गोष्टसुद्धां आतां बोलूं नकोस. अशा पोकळ आश्वासनांनीं माझं चित्त स्थिर होणार नाहीं. चंद्रगुप्ता, आण, माझी गुरुदक्षिणा मला दे. तूं खरा क्षत्रिय असशील तर माझी गुरुदक्षिणा आत्तांच्या आत्तां देशील.

चंद्र०:—( रागावून ) गुरुमहाराज, माझ्या क्षत्रियत्वाविषयींची शंका आपल्या तोंडून निघाली म्हणूनच मीं तो अपमान गिळून टाकला. आपल्याला गुरुदक्षिणा देऊन संतुष्ट करण्याला मी या क्षणीं तयार आहें. गुरुमहाराजांना कोणती गुरुदक्षिणा मान्य होईल याची मला मोकळ्या मनानं आज्ञा व्हावी.

चाण०:—मला गुरुदक्षिणा काय द्यायची हें मी तुझ्यावरच सोंपवितों. तुला जें प्रिय असेल तें मला दे म्हणजे झालं.

चंद्र०:–ठीक आहे गुरुमहाराज! क्षत्रियाला त्याचं राज्य प्रिय असतं. हें पहा, जें मगध देशाचं राज्य आपल्या कृपाप्रसादानं मला प्राप्त झालं आहे त्या सर्व राज्याचं उदक मी आपल्या हातावर सोडतों, त्याचा स्वीकार व्हावा. कोण आहेरे तिकडं? आणा माझी ती रत्नजडित झारी इकडे.

चाण०:–चंद्रगुप्ता, काय! तूं मला आपलं राज्य देणार? अं:! मला ब्राह्मणाला तुझं राज्य घेऊन काय करायचं आहे? तें क्षत्रियाच्याच उपयोगीं. ब्राह्मणाला आपल्या पायांखालच्या भूमीपेक्षां अधिक भूमि केव्हांही लागत नाहीं. आपलं राज्य गुरुदक्षिणा म्हणून देण्यांत तुला क्षत्रियाला जितकं भूषण, तितकंच तें घेण्यांत मला ब्राह्मणाला दूषण आहे.

चंद्र०:–ठीक आहे महाराज! आपल्याला राज्य नको तर राहिलं. राज्याहून प्रिय अशी मजजवळची वस्तु म्हणजे माझे प्राण. गुरुदक्षिणा म्हणून ते मी आपल्याला या क्षणीं वाहतों. आपणाला जेव्हां वाटेल तेव्हां, वाटेल त्या सत्कार्यांत, ते खर्च करण्याला आपण मला सांगा. मी ते खर्चण्याला सिद्ध आहें.

चाण०:–छे! छे! चंद्रगुप्ता, तुझे प्राण तुझ्यापेक्षांही मला अधिक प्रिय आहेत. ते मी गुरुदक्षिणा म्हणून कसे घेऊं? त्यांतूनही आतां तुझ्या प्राणावर तुझं स्वामित्व नाहीं. मग तूं ते मला देणार? या मगध देशच्या प्रजेचीच आतां त्यावर सत्ता आहे. पण चंद्रगुप्ता, तुझ्या राज्या-पेक्षां तुला अधिक प्रिय अशी तुझ्याजवळ एक वस्तु आहे ती मला दे.

चंद्र०:–( आश्चर्यानं ) काय? राज्याहून आणि प्राणाहूनही प्रिय अशी वस्तु? ( आठवून ) होय. अशी एक वस्तु मजजवळ आहे खरी. ती माझी गुरुभक्ति होय! पण महाराज, ती मीं आपणाला यापूर्वींच अर्पण करून सोडलेली आहे. माझी गुरुभक्ति सिद्ध करण्याला मी माझं राज्य आणि माझे प्राण दोन्हीं खर्चीं घालण्याला केव्हांही एका पायावर तयार आहें. मी आपली गुरुभक्ति कोणत्या रीतीनं गुरुमहाराजांच्या निदर्शनाला आणूं त्याची आज्ञा व्हावी.

चाण०:–सांगतों ऐक. हरनंदाचं मस्तक कापून आणून त्या कमलानं तूं आपल्या या गुरुचरणाची पूजा करशील तेव्हांच मी संतुष्ट

होईन. नंदकुळाचा निःपात करण्याची माझी प्रतिज्ञा एऱ्हवीं पुरी होणार नाहीं. कर, प्रतिज्ञा कर ! माझ्या पायाची शपथ वहा आणि नंदकुळाचा निःपात पुरा करीन, असे तुझ्या तोंडचे शब्द मला ऐकूं दे.

चंद्र०ः—ठीक आहे. हा पहा मी आपल्याच पायांवर हात मारून अशी प्रतिज्ञा करतों, कीं नंदवंशांतले उरलेले यच्चयावत् पुरुष—

[बळिराम पडद्यांत म्हणतो—हां ! हां ! राजा, अशी प्रतिज्ञा करूं नकोस.]

चाण०ः—हा कुणाचा आवाज ? राजसभेचं काम चाललं असतां मध्यें बोलून व्यत्यय आणण्याचं धाडस करणारा हा कोण ? चंद्रगुप्ता, तुझ्या अधिकाऱ्यांना राजसभेची साधी व्यवस्थाही ठेवतां येत नाहीं, काय करावं ?

चंद्र०ः—कोण आहेरे तिकडे ? जा आणि राजसभेंत राजाज्ञेशिवाय बोलणाऱ्या या मनुष्याला पाश घालून प्रतिबंधांत ठेवा. (सेवक जातात) महाराज, माझी शपथ ऐका. माझी प्रतिज्ञा ऐका—

[बळिराम पडद्यांत म्हणतो—हां ! हां ! राजा, भलतीच प्रतिज्ञा करूं नकोस.]

राजसेवकः—(परत येऊन) महाराज, बाहेर तर कुणीच नाहीं !

चाण०ः—मग कुणा पिशाचाला वाचा फुटली असं मी समजूं काय ? पण पिशाच्चाला झालं तरी या चाणक्याची भीति वाटायला पाहिजे होती.

चंद्र०ः—ऐका महाराज. मी अशी प्रतिज्ञा करतों, कीं हरनंदाला मेलेला किंवा जिवंत धरून आणून आपल्या स्वाधीन करीन. नंदकुळाचा एकही पुरुष—

[पडद्यांत बळिराम म्हणतो—राजा, नंदाचा संहार तूं केलास तो पुरे नाहीं का झाला ? पितृघातक्या, झाली एवढी हत्या काय थोडी झाली ?]

चाण०ः—काय, फिरून तोच आवाज ? जा. गुप्त मार्ग शोधा, जा. कुणा नंदपक्षपाती मनुष्याचा हा कपटाचा खेळ असेल—

[पडद्यांत बळिराम हंसून म्हणतो—ही कल्पना व्यर्थ आहे. मी नंदाचा पक्षपातीय मुळींच नाहीं. तरी पण राजा, पितृघाताबरोबर आत्मघातही करूं नकोस !]

चंद्र०ः—मला आत्मघाताची भीति दाखवून प्रतिज्ञा-विन्मुख करण्याची प्रत्यक्ष देवांचीही योग्यता नाहीं. मग मनुष्यांची काय कथा ? गुरुमहाराज, ऐका. मी अशी प्रतिज्ञा करतों, कीं नंदवंशाचा एकूणएक पुरुष—

[ पडद्यांत बळिराम म्हणतो—राजा, आत्मघाताची भीति तुला वाटत नसेल तर मिथ्याप्रतिज्ञत्वाची भीति तरी तुला वाटूं दे. अज्ञानानं केलेल्या प्रतिज्ञा व्यर्थ जातात. राजा, नंदवंशांतले यच्चयावत् सर्व पुरुष मारण्याची प्रतिज्ञा तूं करूं नकोस. ती प्रतिज्ञा कधींही श्रेयस्कर होणार नाहीं. ]

चंद्र०:—( पाय आपटून ) राजवचनाला प्रतिबंध करूं पहाणाऱ्या मायावी मनुष्या, तुझी आशा व्यर्थ आहे. या चंद्रगुप्ताचा संकल्प निष्फळ करण्याचं सामर्थ्य कुणांतही नाहीं. ही पहा मी प्रतिज्ञा करतों, कीं नंदवंशांतले एकूणएक पुरुष मी मारीन तरच मी नांवाचा खरा चंद्रगुप्त—

[ पडद्यांत बळिराम हंसून म्हणतो—प्रतिज्ञाही खोटी आणि नांवही खोटं. अज्ञानाचा खेळ! सर्व अज्ञानाचा खेळ! राजा, मी तुझा शत्रु नसून मित्र आहें. पण तुझी प्रतिज्ञा मला खोटी केलीच पाहिजे. ]

चंद्र०:—हा काय प्रकार आहे, कांहीं कळत नाहीं! वीरसेना, जा, राजवाड्याचे सर्व गुप्त मार्ग शोध, आणि माझ्याशीं वाद करणारा हा कोण उन्मत्त मनुष्य असेल त्याला धरून घेऊन ये. त्याला मला शासन केलंच पाहिजे.

[ पडद्यांत बळिराम म्हणतो—राजा, तूं आपल्या सेवकांना कशाला श्रम देतोस? मी या क्षणीं तुला सांपडणार नाहीं; पण पुन्हां मात्र लवकरच तुला येऊन भेटेन. माझी आठवण ठेव, मी जातों. ]

चाण०:—( तिरस्कारानें हंसून ) चंद्रगुप्ता, जाऊं दे. अमात्य राक्षसांच्या मायेचे असे पुष्कळ खेळ मीं आजवर पाहिले आहेत. मला याचं कांहींच वाटत नाहीं. अहाहा! आज मी धन्य आहें. तुझ्या प्रतिज्ञासिद्धीच्या योगानं माझी प्रतिज्ञा सिद्धीस जाण्याला अद्यापि जरी थोडासा अवधि असला, तरी तुझ्या सत्यप्रतिज्ञत्वावर माझा पुरा विश्वास आहे. म्हणून तें सुख मला या क्षणीं झालं असं मी समजतों. शाबास, शिष्य असावा तर असा असावा! बरं, दुसरीही एक गोष्ट तुला केली पाहिजे.

चंद्र०:—ती कोणती महाराज?

चाण०:—नंदराजांना प्रजेचं इतकं पाठबळ असेल अशी मला कल्पनाही नव्हती. राजा कितीही जुलमी आणि अप्रिय झाला तरी तो

राज्यपदावरून भ्रष्ट होणार असं पाहतांच लोक त्याची कींव करूं लागतात, आणि त्याच्याकरितां प्राणही देण्याला तयार होतात. असो; मनुष्यस्वभावाचा हा एक चमत्कार नंदराजाच्या प्रजाजनांनीं मला दाखविला; तेव्हां त्याच्या मोबदला मनुष्यस्वभावाचा दुसरा एक चमत्कार त्यांना दाखविणं मला प्राप्त झालं आहे. या नगरच्या लोकांनीं पाहिला नसेल किंवा ऐकला नसेल असा भयंकर सूड मी त्यांच्यावर घेणार.

चंद्र०:—नंदपक्षपाती लोकांना कोणची शिक्षा करायची त्याची आज्ञा व्हावी गुरुमहाराज!

चाण०:—एक. ज्या कोणीं नंदराजांना मदत केली असेल त्यांना देहांत प्रायश्चित्त देण्यांत यावं, आणि ज्या कोणीं अप्रत्यक्ष मदत केली असेल त्यांची सर्व धनसंपत्ति जप्त करण्यांत यावी. या शिक्षा जबर आहेत हें मी जाणतों. पण हरनंद जिता किंवा मेलेला हातीं लागून नंदवंश समूळ खणून काढण्याची माझी प्रतिज्ञा शेवटास जाईपर्यंत, प्रजाजनांना जरब बसण्याकरितां, माझी आज्ञा अमलांत राहिलीच पाहिजे.

चंद्र०:—ठीक आहे, गुरुमहाराज. सर्व कांहीं आपल्या आज्ञेप्रमाणंच होईल.

चाण०:—असो; पूर्वसंकल्पाप्रमाणं तपश्चर्येच्या समाप्तीकरितां आतां मला केदारवनांत गेलंच पाहिजे. चंद्रगुप्ता, तुझं कल्याण असो.

[ चाणक्य, चंद्रगुप्त व त्याच्या मागून सर्व सरदार जातात. ]

## प्रवेश तिसरा.

स्थळ—आनंदभुवनाजवळचा रस्ता.

[ कांतिवर्मा प्रवेश करितो. ]

कांति०:—आजपर्यंत मीं मावळत्या सूर्याला अर्घ्यप्रदान केलं. आतां तें उगवत्या सूर्याला करावं लागणार! त्यालाही आपली तयारी आहेच. दुसऱ्याच्या सद्दीचं पीठ पाहून त्यांत आपल्या सहानुभूतीचं मीठ मिसळण्याला मी नेहमीं तयार असतों. यामुळं गोड भाकरी खायला मला

केव्हांच पंचाईत पडत नाहीं. नंद सत्ताधीश होते तोंपर्यंत मी त्यांचा पक्षपाती होतों. मधुपूरची लढाई होऊन नंद व चंद्रगुप्त यांचे पक्ष सम-समान झाले तेव्हां मी कुणाचाच पक्षपाती राहिलों नाहीं. आणि कुसुमपूरची लढाई होऊन चंद्रगुप्ताचा जयध्वज राजधानीवर फडकूं लागतांच त्याचा पक्षपाती म्हणून मिरवायला मी मोकळाच! (हंसून) केव्हढं घनघोर युद्ध झालं, पण माझ्या अंगावर एवढासा ओरखडा निघाला असेल तर शपथ! शिवाय युद्धाचे गुण गाण्याचा प्रसंग आला, कीं माझा पाय सर्वांच्या पुढं. पण खरंच, युद्धाच्या अंगीं गुण नाहींत असं कोण म्हणेल? दुसऱ्यांनीं युद्ध करावं आणि आपण तें पहावं. आणि फारच झालं तर युद्धाचे रम्य गुण गाऊन नाटकी वीररसाला वाद-विवादाच्या रंगभूमीवर खूप आळवावं. यांत किती तरी मौज आहे! फायदा सर्व बाजूंनीं, तोटा मुळींच नाहीं. ही अशी एकेरी पैज कुणालाही हटकून जिंकतां येईल. पण हें कळायला झालं तरी, माझ्यासारखी अक्कल लागते अंगांत. [ व्यतिपात प्रवेश करतो. ]

व्यति०:—( थट्टेनं रडत ) हाय! हाय! सर्वस्वीं घात झाला. कांति-वर्म्या, तूं तरी कांहीं उपाय सांग.

कांति०:—अरे! काय, झालं तरी काय? तुझ्या रडण्यावरून आणि आक्रोशावरून तुझी कांहीं तरी मोठी हानि झालेली दिसते.

व्यति०:—( रडत ) होय. फार मोठी हानि झालीरे, फार मोठी हानि झाली.

कांति०:—तुझ्या घरचीं सर्व मुलं माणसं खुशाल आहेत ना?

व्यति०:—होय, सगळीं खुशाल आहेत, एकसुद्धां कमी झालं नाहीं.

कांति०:—मग तुझा कोणी जिवलग आप्त गमावला काय?

व्यति०:—मला आप्त इतके आहेत, कीं त्यांच्याकरितां मी रडूं लागलों तर मला सारा जन्मही पुरणार नाहीं.

कांति०:—मग तुला प्रिय असा कोणी स्नेही-सोबती लढाईंत पडला काय?

व्यति०:—लढाईंत पुष्कळ लोक पडले, पण त्यांत मला प्रिय असा कोणीच नव्हता. उलट पृथ्वीचा भार हलका झाला म्हणून मी आनंदच मानतों.

कांति०:-अरे, मग तूं रडतोस कुणाकरितां?

व्यति०:-माझ्या स्वतःकरितां. माझा मोठा घात केला रे!

कांति०:-अरे पण तो कुणीं?

व्यति०:-महाराज नंद आणि कुमार चंद्रगुप्त यांनीं!

कांति०:-वः! हे तर परस्पर वैरी! या दोघांनीं मिळून तुझा घात कसा केला बुवा?

व्यति०:-नंदांनीं लढाईत लवकर हार खाऊन आणि चंद्रगुप्तानं त्यांना आपल्या पराक्रमानं लवकर हार खायला लावून!

कांति०:-वः! यांत नंदांची हानि झाली खरी, तुझी कशी?

व्यति०:-कशी म्हणजे? युद्ध सुरू होतं तोंपर्यंत माझं सर्व यथास्थित होतं, पण तें थांबल्यापासून (रडत) मी अगदीं उघडा पडलों रे!

कांति०:-तो कसा रे बुवा? युद्धानं तुझ्यावर असं काय पांघरूण घातलं होतं तें सांग तर पाहूं?

व्यति०:-सांगतों ऐक. माझ्या अंगीं जे जे म्हणून दुर्गुण होते ते सर्व या युद्धाच्या काळीं सद्गुण बनले होते. माझ्या फाजिलपणाला धाडस आणि धाडसाला शौर्य असं नांव मिळालं होतं. माझ्या कज्जेदलाल-पणानं मला वीर बनवलं होतं. रक्तपात करण्याच्या माझ्या इच्छेला पराक्रम म्हणत! मी उनाडकी करायला निघालों, कीं स्वारीवर निघालों असा लौकिक होई. आणि मीं जरी केवळ चोरी करून माल मिळविलेला असला तरी 'ही पहा, शत्रुपक्षाकडची लूट!' असं मी म्हणतांच त्याला भूषणास्पद नांव मिळे. युद्ध सुरू असतां मी जितकं जितकं अधिक खोटं बोलें तितकी माझ्या अंगीं मुत्सद्दिगिरी अधिक, असंच लोक मानीत. फार काय, पण मी भिऊन मुठींत जीव घेऊन पळून आलों तरी लोक म्हणत कीं 'पहा! हा लढवय्या किती कावेबाज आहे! वेळ अवेळ याचं तारतम्य याच्याचपासून शिकावं.' पण आतां युद्ध थांबल्याबरोबर माझ्या या सर्व सद्गुणांचं मातेरं होण्याची वेळ आली आहे. म्हणून कांतिवर्म्या, मी रडतों, दुसरं काय?

कांति०:-(स्वगत) माझ्या धूर्तपणाची घमेंड जिरवायलाच परमेश्वरानं याला पाठविलं कीं काय? पण असो. मीं योजलेल्या मसलतींत या माझ्या

मित्राचा चांगलाच उपयोग होईल; तो करून घेतला पाहिजे. ( उघड ) मित्रा, व्यतिपाता! शाबास! तुझं बोलणं मला अगदीं बरोबर पटलं. मी तुझ्याच मताचा आहें. पण युद्धाचे हे अपूर्व आणि गुप्त सद्गुण मलाही चांगलेसे कळले नव्हते. ( गंभीरपणानं ) पण बाबा, गेल्याचा शोक करून काय उपयोग? आज सहा महिनेपर्यंत युद्धाची धुमश्चक्री कशी छान माजून राहिली होती. पण गादीचा उपभोग मिळत असलेल्या, किंवा तो उपभोग घेऊं इच्छिणाऱ्या, बलाढ्य लोकांनाच अशी धुमश्चक्री माजविण्याचं साधतं. आम्हीं मनांत कितीही इच्छा धरली, तरी असला महत्प्रसंग फिरून उत्पन्न करायची कुठं आहे आमच्यांत ताकद?

व्यति०:–( रडत ) तर मग काय? कांतिवर्म्या, माझी हानि झाली ही काय कायमचीच समजूं?

कांति०:–( गंभीरपणानं ) नाहीं, तसं मात्र मानण्याचं कांहीं कारण नाहीं. हा सर्व मगध देश व्यग्र करून सोडण्यासारखा युद्धप्रसंग माजविण्याचं जरी तुझ्या-माझ्या हातीं नसलं तरी आपापल्याभोंवतीं रणसंग्राम माजविणं हें तुझ्या-माझ्या हातचं खचित आहे. अरे, तुझ्या माझ्यासारख्या लहान मनुष्याच्या अंगीं झालं तरी, मुळींच पराक्रम नाहीं असं कां होईल? पहा बरं, विंचू, गांधीलमाशी, यांचा आकार केवढासा? पण त्यांच्याही लहानशा नांगींत त्या दयाळू परमेश्वरानं कसं जलाल विष ओतून ठेवलं आहे तें. त्यांचा दंशसुद्धां कित्येक प्रसंगीं प्राणघातक होतोच कीं नाहीं? म्हणून म्हणतों, बाबा व्यतिपाता, अशा कामीं धीर सोडून उपयोगीं नाहीं.

व्यति०:–मग करावं तरी काय?

कांति०:–अरे, तरवार तीक्ष्ण असली म्हणजे तिला केव्हां ना केव्हां तरी खाद्य मिळणारच! तुझ्या-माझ्यासारख्या भल्या मनुष्यानं द्वेषबुद्धीच्या तरवारीची धार कोणत्या तरी सत्कार्याच्या कठोर दगडावर घांसून नेहमीं तीक्ष्ण ठेवावी. परमेश्वर तिला काम दिल्याखेरीज कधींही रहात नाहीं!

व्यति०:–( स्वगत ) मी स्वतःलाच मोठा कांगावखोर समजत होतों. पण, यानं माझ्यावरही ताण केली. ( उघड ) कांतिवर्म्या! शाबास. कळेदलालीची फक्त ऐहिक आणि सांसारिक बाजू मला आजपर्यंत माहीत

होती; पण द्वेषबुद्धीनं कर्जदलाली करणं हें एक पवित्र कर्तव्य आहे, आणि परमेश्वराचाही त्यांत संबंध येऊं शकतो हें आज तूंच मला दाखविलंस! ( हात जोडून ) आपण माझे गुरु आहां!

कांति०:–( हंसून व व्यतिपाताच्या पाठीवर हात मारून ) आणि मलाही शिष्य पटला! पण कायरे लब्बाडा? मी तुझा गुरु आणि तूं माझा शिष्य झालास, म्हणजे यापुढं तुझ्या पोटापाण्याची काळजी बाळगण्याचं कामही मजकडंच आलं?

व्यति०:–( हंसून ) अलबत्, मग या दिवसांत लोक गुरु करतात ते काय उगीच मोक्षाकरतां वाटतं?

कांति०:–कांहीं हरकत नाहीं. अरे, तुझी आणि माझी बुद्धि जुळली म्हणजे पोटापाण्याला रे काय कमी? नंद आणि चंद्रगुप्त यांनीं माजविलेला रणसंग्राम थांबेना का? पण तुझ्या-माझ्यामध्येंही काय करामत आहे हें दाखविण्याची वेळ हीच! ( पडद्यांत दवंडीवाला दवंडी पिटतो. ) अरे पण ऐक, ही कसली तरी दवंडी पिटली जाते आहे! [ दवंडीवाला प्रवेश करतो. ]

दवंडी०:–( मोठ्यानं ओरडून ) ऐकाहो ऐका! सर्व लोक ऐका! आर्य चाणक्यांचे शिष्य, नंद-कुळाचा उच्छेद करणारे महाराज चंद्रगुप्त मौर्य, यांची मगध देशच्या सर्व प्रजाजनांना अशी आज्ञा आहे, कीं आज सहा महिने माजलेला दुःखकारक रणसंग्राम परमेश्वराच्या कृपेनं हल्लीं संपला आहे. अन्यायी अधम नंदांचा संहार होऊन आर्य चाणक्यांची प्रतिज्ञा बहुतेक शेवटाला गेली. या रणसंग्रामांत ज्यांनीं ज्यांनीं नंदांच्या पक्षाला सहाय्य केलं आणि महाराज चंद्रगुप्तांच्या पक्षाला विरोध केला, ते सर्व आर्य चाणक्यांचे आणि महाराज चंद्रगुप्तांचे शत्रु म्हणून कडक राजदंडाला पात्र आहेत. तथापि, राज्यक्रांतीच्या वेळीं कोणत्या पक्षाला मिळावें याचा निर्णय करायला लोकांना फार कठिण जातं, आणि नंदराजे अन्यायी व अधम असले तरी कित्येक प्रजाजनांच्या मनांत त्यांच्याविषयींची स्वामिभक्ति वंशपरंपरेनं आलेली आणि प्रामाणिकपणाची होती, ही गोष्ट लक्षांत घेऊन, महाराज चंद्रगुप्त अशी आज्ञा करतात, कीं जे अपराधी प्रजाजन अधिकाऱ्यांना शरण जाऊन व अपराध पदरीं घेऊन, फिरून अपराध करणार नाहीं अशी शपथ वाहतील, त्यांना हा राजदंड भोगावा लागणार

नाहीं. पण जे कोणी असें करणार नाहींत ते क्षमेला मुकतील आणि त्यांना कडक शासन भोगावं लागेल हो—

कांति०:—व्यतिपाता! ऐकलंस? बोल आतां, तूं कोणत्या पक्षाचा?

व्यति०:—अरे, मला काय विचारतोस? जिकडे गुरु तिकडे शिष्य!

दवंडी०:—ऐकाहो ऐका! लोकहो, आणखी ऐका! आर्य चाणक्य आणि महाराज चंद्रगुप्त यांची आणखी अशी आज्ञा आहे, कीं नंद-वंशाचा शेवटचा पुरुष हरनंद हा पुष्पपूरच्या लढाईतून पळून गेला आहे. तो जिवंत किंवा मेलेला जो कोणी धरून आणून देईल त्याला महाराज चंद्रगुप्तांकडून दहा सहस्र दिनार बक्षीस दिले जातील. पण जो कोणी हरनंदाला मदत करील किंवा थारा देईल, त्याचा शिरच्छेद केला जाऊन त्याच्या घरादारावरून नांगर फिरविला जाईल. एवढंच नव्हे, तर त्याच्या वंशाचीं पाळंमुळंही खणलीं जातील. तर संभाळा हो— [जातो.]

कांति०:—कां व्यतिपाता, पाहिलंस? ऐकलीस ही दवंडी? सांग आतां, तुझ्या-माझ्यासारख्याला कलहाला काय तोटा? नंदवंशाचं सल अजून चाणक्यांच्या मनांत सलतं आहे. तेव्हां तुझ्या-माझ्यासारख्या मनुष्याची पुरी चंगाळी.

व्यति०:—मी त्याची काळजी कशाला करूं? तुला मीं गुरु केला तेव्हांच, यापुढचं सर्व संकल्प-विकल्प करण्याचं कामही मीं तुझ्याकडंच देऊन टाकलं. आतां यापुढं गुरूनं सांगावं आणि शिष्यानं ऐकावं, इतकंच काय तें राहिलं.

कांति०:—(हंसून) ठीक आहे. चाणक्य आणि चंद्रगुप्त ही झाली एक गुरुशिष्यांची जोडी—

व्यति०:—आणि तूं आणि मी ही दुसरी जोडी! असंच कीं नाहीं?

कांति०:—अलबत्! बरं, बोल आतां व्यतिपाता, आपल्याला काय कमी? हरनंद राजपुत्र सांपडेपर्यंत मगध देशभर हेरांचा असा कांहीं सुळसुळाट होणार आहे, कीं बोलायची सोय नाहीं.

व्यति०:—आणि त्यांतलेच आपण दोघे असा बहाणा केला, कीं आपलं काम झालं! असंच कीं नाहीं?

कांति०:–अलबत्! हेर म्हणून नेमायला राजमुद्रेचं आज्ञापत्र थोडंच लागतं? हरनंद पकडण्याविषयींची राजाज्ञा जाहीर रीतीनं दवंडीवाल्यांकडून प्रसिद्ध करण्यांत आली आहे. तेव्हां त्यांतील बक्षीस मिळवावं अशी ज्यांच्या म्हणून मनांत इच्छा होईल त्यांना त्या क्षणीं हेराचं काम करण्याचा परवाना मिळाला असंच समजायचं!

व्यति०:–पण कायरे? हरनंद काय तो येऊनं जाऊन एकटा एक. तो कुणाला तरी एकट्याला कुठं तरी एका ठिकाणीं सांपडणार. मग बाकीच्या शेकडों हेरांचे श्रम फुकटच जाणार कीं नाहीं?

कांति०:–वेडारे वेडा! याला त्यांतलं कांहींएक कळत नाहीं. खरा हरनंद एकच असला तरी 'तूंच हरनंद पळून चालला आहेस नाहीं? चल पाटलीपुत्राला,' असं आम्हां हेरांना किती तरी लोकांना म्हणतां येईल. याला कांहीं सीमा आहे काय?

व्यति०:–आणि पाटलीपुत्राला नेल्यावर तो खोटा ठरला तर?

कांति०:–तुला कांहीं कळत नाहीं तें हेंच. खोट्या संशयावरून पकडलेला मनुष्य राजधानीपर्यंत नेण्याची पाळी येईल तर ना? अरे, तो त्यापूर्वीच त्या हेराचा हात ओला करून मोकळा होणार! खरा हरनंद पकडणाराला दहा सहस्र दिनार मिळतीलच. पण हरनंदाचा खोटा आरोप आलेल्या शेकडों इसमांकडून मिळून दहा हजारांच्या वर बेरीज होईल.

व्यति०:–बरं, पण हरनंदाची चवकशी करायची तरी कुठं कुठं?

कांति०:–अरे, फरारी झालेल्या मनुष्याचा शोध कुठं करायचा असं काय विचारतोस? कुठं न करायचा असं विचार! आपल्या मनाला वाटेल तिथं त्याला हुडकावं, आणि हुडकण्याच्या निमित्तानं काय वाटेल तें करावं. हरनंद पुरुष आहे, म्हणून वाटेल त्या तरुण मुलावर 'तूंच हरनंद' असा आळ घालतां येईल.

व्यति०:–आणि स्त्री असेल तर?

कांति०:–तीही तावडींतून सुटण्याचं कारण नाहीं! कारण, हरनंद स्त्रीवेषांत पळून गेला हें ज्याच्या त्याच्या तोंडीं आहेच. म्हणून जगांत इतर हेर जें करतात तेंच आपणही करायचं. धामधूम करायची आणि

काय मिळेल तें उपटायचं ! हो, बरी आठवण झाली. तुला एक सांगून ठेवायचं आहे. तूं आणि मी मिळून आतां जिथं जिथं जाऊं, तिथं तिथं आपणाला सिद्ध–साधकांसारखं वागलं पाहिजे. यापुढील कपटनाटकांतील कामं तुझीं आणि माझीं निरनिराळीं असणार !

व्यति०:–तीं कशीं काय बुवा ?

कांति०:–तीं अशीं. तूं उकरावंस, मीं सारवावं. तूं लाथ मारावीस, मी नमस्कार करावा. तूं शिव्या द्याव्यास, मी गोड बोलून स्तुति करावी. तूं पोळवावंस, मीं फुंकावं—

व्यति०:–वः ! म्हणजे माझ्याकडं सर्व धाडसाचीं आणि वाईटपणा येण्याचीं कामं दिलींस, आणि तूं मात्र सर्व भलेपणा आपणाकडेच घेणार !

कांति०:–मग, यांत काय वावगं ? तूं शूर लढवय्या लष्करी थाटाचा मनुष्य; तुझ्या स्वभावाप्रमाणंच तुझ्याकडं काम देण्यांत आलं. शिवाय तूं शिष्य आणि मी गुरु. तेव्हां मला माझ्याकडं सात्त्विक आणि गंभीरपणाचंच काम घेतलं पाहिजे.

व्यति०:–बरं आहे बुवा, आतां नाहीं म्हणून काय होणार ? तूं गुरु म्हणून एकदां कबुली दिली, तेव्हां मला आतां तूं सांगशील तसंच वागलं पाहिजे.

कांति०:–एवढंच नव्हे, पण आपल्याला जी जी कांहीं मिळकत होईल ती, मी गुरु म्हणून मला अर्पण झाली असंच तुला समजलं पाहिजे. ( हंसून ) आणि गुरु हात उचलून देईल तेवढाच प्रसाद काय तो शिष्याचा.

व्यति०:–हं ! बरं, पण आपली पहिली शिकार कुठं मारायची ?

कांति०:–गुरु या नात्यानं मीं पूर्वीच त्याची योजना करून ठेवली आहे. आपली पहिली स्वारी आनंदभुवनावर होणार. आणि तिथं शिकार काय पण भरपूर आहे !

व्यति०:–ती कशी काय ?

कांति०:–आनंदभुवनाचा धनी चंदनदास हा नंदपक्षपाती म्हणून प्रसिद्धच आहे. त्याचा मुलगा माधव हा युद्धांत नंदाच्या बाजूनं लढायला गेला होता. तो युद्धांत बहुधा पडला असावा अशी माझी समजूत आहे.

मागं त्याचा मरायला टेकलेला वृद्ध बाप व तारिणी नांवाची एक तरुण बहीण इतकींच काय तीं माणसं आहेत. नंदांचा पराभव आणि संहार झाल्यामुळं त्यांच्या बाजूचीं सर्व घराणीं यापुढं निर्माल्यवत् होणार. लुटायला आणि छळायला या राज्यक्रांतीच्या काळीं असलीं घराणीं फार उत्तम. कारण त्यांचा वाली कुणीच नसतो. असो! चल, मी आनंदभुवनाचा चांगला माहितगार आहें. आपण आनंदभुवनाकडं जाऊं, त्यावर जप्ती आणूं आणि मग लूट काय वाटेल तितकी!

**व्यति०:**—पण तिथं गेल्यावर सिद्धसाधकपणा कसा करायचा याची कांहीं दीक्षा देशील कीं नाहीं?

**कांति०:**—चल, वाटेनं मी तुला सर्व सांगतों. [जातात व पडदा पडतो.]

## प्रवेश चवथा.

स्थळ—आनंदभुवनाजवळील बाग.

[तारिणी व बळिराम प्रवेश करतात.]

**तारि०:**—हें कायरे असं करतोस बळिदादा?

**बळि०:**—काय केलं ग बया मीं?

**तारि०:**—काय केलं काय म्हणतोस? मी तुला केव्हांची सांगतें आहे, कीं टेकडीवर जाऊन तेवढा माधवदादा आला का पहा म्हणून. पण तूं आपला इथंच घुटमळतो आहेस. इतका वेळ झाला, बाबा तुला काय म्हणतील बरं?

**बळि०:**—(स्वगत) अरे, हा माधवच इकडे येत आहे वाटतं. हिची थोडी थट्टा करूं या. (उघड) अग, तो काय म्हणणार? म्हणेल, कीं बळिराम आपल्या वळणावर गेला म्हणून!

**तारि०:**—मग तूं काय सांगशील त्यांना?

**बळि०:**—मी सांगेन, मी शकुन पहात होतों म्हणून. शकुन पाहिल्याशिवाय मला एक पाऊलही पुढं टाकवत नाहीं.

**तारि०:**—मोठा बाई तूं दीर्घसूत्री. नुसतं टेकडीवर जाऊन दादा येतोसा दिसतो का पहायचं. त्याला रे शकुन कशाला पहायला हवा?

बळि०:–हो, हो, पहावा लागतो तर! शकुन आला, आणि मी पहायला गेलों तर तुझा दादा येईल, आणि मला दिसेल. पण शकुनच जर न आला तर तुझा दादा येणार कसा आणि आला तरी मला दिसणार कसा? सांग बरं! पोरी, तूंच सांग!

तारि०:–मला वाटतं बळिदादा, रात्रीं प्यायलेल्या अमृताचा अंमल अजून तुझ्यावरून गेला नाहीं!

बळि०:–पोरी, ओळखलंस ग ओळखलंस!

तारि०:–हें काय रे? सगळीच टवाळी? तुला वाटलं, कीं मीं जशी कांहीं तुझी स्तुतिच केली! होय?

बळि०:–अग, तूं स्तुति कर नाहीं तर निंदा कर. माझं वैभव मला संभाळलंच पाहिजे.

तारि०:–म्हणजे? भांग पिणं हें वैभव वाटतं?

बळि०:–यांत काय संशय?

तारि०:–सगळीच मेली थट्टा! अरे, प्रसंग कोणता आणि तुला थट्टा कशी आठवते?

बळि०:–वः! अग, प्रसंग हा असा म्हणून तर माझं वैभव मला संभाळलं पाहिजे. नंदाचं राज्य गेलं तसं मी आपलं वैभव घालवूं म्हणतेस कीं काय? बळीच्या राज्यांत वैभव कशाचं असतं सांग बरं? भांग आणि द्यूत यांचंच! म्हणून मी भांग पितों, आणि द्यूत खेळायला कोणी न मिळाला तर शकुन पहायला तरी फांसे टाकतों. नंद बेटे मूर्ख, म्हणून त्यांना आपलं राज्य संभाळतां आलं नाहीं. मी तसा नाहीं हो! माझ्या राज्यांत चंद्रगुप्त येऊं दे तर खरा, म्हणजे पहा मी त्यालाच कसा जिंकून टाकतों तो! भांग आणि द्यूत यांचं साम्राज्य अजिंक्य आहे. त्यांतली सर्व प्रजा सदोदित राजनिष्ठ राहते आणि बंडाळी म्हणून कशी ती होतच नाहीं.

तारि०:–शर्थ झाली बाई तुझ्या तोंडाळपणाची बळिदादा! थांब, मी स्वतःच टेकडीवर जाऊन पाहतें दादा कुठें दिसतो आहे का तो!

बळि०:–तूं जाणार? जा बापडी. पण थांब जरा. शकुन कसा काय निघतो तो पहातों. (तारिणी जाऊं लागते.) तारिणी, थांब. उगीच कशाला हेलपाटा घेतेस? तो पहा, तुझ्या पाठीमागं कोण उभा आहे तो!

तारि०:-( माधव प्रवेश करितो, त्याला पाहून दचकून ) कोण? दादा, तूं केव्हां आलास? खुशाल आहेस ना? लढाईचं काय वर्तमान? महाराजांचं कसं काय आहे? बाबा कि नाहीं, तुझ्या वाटेकडं एकसारखे डोळे लावून बसले आहेत.

माध०:-ताई, काय सांगूं? दुर्दैवानं मी जिवंत आहें. चार जखमा झाल्या, पण एकीनंही माझा प्राण घेतला नाहीं. आणि हें काळं अभागी तोंड बाबांना दाखवायला मी जिवंत परत आलों.

[ दोघेंही गळ्यांत गळा घालून रडतात. ]

बाळि०:-अरेरे, जिवंत परत आला हें अगदीं वाईटच झालं असेल नाहीं? जिवापेक्षां मृत्यूला किंमत अधिक, आणि तो मिळाला नाहीं म्हणून हा माधव आतां रडत बसणार! आणि ही वेडीभोळी पोरगी त्याच्या रडगाण्याला सूर देणार! चला. हा अन्याय बळीच्या राज्यांत खपायचा नाहीं मुळींच. आपण आपला आतां येथून पाय काढावा, हाच मार्ग उत्तम. ते त्यांचे दुसरे वृद्ध साथीदार बसले आहेत तिकडं हेंच रडगाणं गायला तंबोऱ्याची तार लावीत! तर चला. आपण त्यांना ती तार खेंचायला मदत करूं. माझी भांगेची तार पुरवली, पण तुमची ही रडगाण्याची तार नको. [ जातो. ]

तारि०:-दादा! असं अभद्र कां बोलतोस? रणांगणावर तुला प्रत्यक्ष मरणच न आलं तरी स्वामिकार्याकरितां तूं मरणाचीही पर्वा केली नाहींस, हें तुझ्या जखमांवरून दिसत नाहीं का?

माध०:-ताई! स्वामिकार्य मनासारखं साधलं असतं तर मग जिवंत राहून या जखमांचे वण राजभक्तीचं चिन्ह म्हणून अंगावर वागविण्यांत मला किती तरी आनंद झाला असता व भूषण वाटलं असतं. पण त्या कार्याचा नाश झाल्यामुळं जीव बचावल्याचा आनंद नाहीं व जखमांचं भूषणही नाहीं.

तारि०:-पण असं झालं तरी काय तें सांग.

माध०:-तारिणी! काय सांगूं तुला? आमच्या अपयशाला सीमाच राहिली नाहीं. अमात्य राक्षस आणि नंदमहाराजांचं सैन्य यांनीं आपल्या

शौर्याची शर्थ केली. त्यांनीं आपल्या रक्ताच्या नद्या वाहविल्या व हाडांचे पर्वत रचले! पण या नद्या व हे पर्वत ओलांडून आमचं दुर्दैव तीरासारखं जाऊन महाराजांच्या काळजाला भिडलं!

तारि०:-( सुस्कारा टाकून ) असो; ल्ढेल त्याला अपेश केव्हां तरी एखादे वेळीं येणारच. पण राजघराण्यांतली सर्व मंडळी तरी खुशाल आहेत ना? तेवढं असलं तरी पुरे! मूर्ति शाबूत राहील तर कीर्ति पुढंमागं मिळेल! जें यश आज गेलं तें उद्यां मिळेल अशी आशा करायला जागा तरी राहील!

माध०:-ताई! यशाची आशा आतां यापुढं कशाला? ज्याच्याकरितां रणांगणांत आम्हीं यश मिळवायचं तें आज संपलं! नंदमहाराजांचा संहार झाला!

तारि०:-( दुःखानें ) काय? म्हणतोस तरी काय दादा?

माध०:-होय ताई! ( तारिणी दुःखामुळें डोळे धरून बसते.) नंदमहाराजांचाचसा काय? पण—( स्वगत ) ताईला एकदम सर्व खरा प्रकार सांगूं का? पण नको. गुप्त गोष्टीचा मंत्र षट्कर्णी करतां कामा नये. ( उघड ) नंदमहाराजांचा, त्यांच्याबरोबर त्यांच्या सर्व पुत्रपौत्रांचा–फार काय सांगूं? पण सर्व नंदकुळाचा अवतार समाप्त झाला!

तारि०:-हाय रे दैवा! तुला हें कसं आवडलं?

माध०:-दैवाला आवडलं हें खरं. पण, असा हा संहार देवाला ग कसा आवडला? तो न्यायी म्हणतात ना? एका यःकश्चित् भिक्षुक ब्राह्मणाला सहाय्य होऊन, केवळ त्याच्या वैरबुद्धीच्या शमनाकरितां, अनादिकालापासून चालत आलेला नंदवंश–क्षत्रियांचं प्रमुख कुळ–त्यानं बुडविलं, हें पाहून त्याला यापुढं न्यायी किंवा निःपक्षपाती असं कोण म्हणेल?

तारि०:-असो. चल दादा. आपण बाबांच्याकडं जाऊं. ते तुझी एकसारखी वाट पहात बसले आहेत.

माध०:-पण ताई! बाबांच्याकडं जाऊन त्यांना सांगूं तरी काय?

तारि०:-होय. दादा, मलाही हाच विचार पडला आहे. युद्ध सुरू झाल्यापासून काळजीनं त्यांची प्रकृति फारच बिघडली आहे; आणि तूं

आणलेली भयंकर बातमी जर एकदम त्यांच्या कानावर गेली, तर त्यांच्या प्रकृतीला खचित अपाय झाल्याशिवाय रहाणार नाहीं. पण चल. बाबांच्या कानावर ही हकीकत किती आणि कशी घालायची याचा आपण जातां जातां विचार करूं.

माध०:–ठीक आहे, चल. ( इकडे तिकडे पाहून ) पण ताई, थांब. बाबांच्याकडं जाण्यापूर्वी एका कामांत मला तुझी मदत पाहिजे. मला तुला कांहीं विचारायचं आहे. [ कावराबावरा होऊन इकडे तिकडे पहातो.]

तारि०:–खुशाल विचार. पण दादा, तूं असा कावराबावरा कां झाला आहेस ? कोणी तुझ्यामागून येतं आहे असं का वाटतं तुला ?

माध०:–नाहीं. माझ्यामागून कोणी येत नाहीं. पण माझ्याबरोबर कुणी आलं आहे त्याची मला भीति वाटते.

तारि०:–( आश्चर्यानें ) तुझ्याबरोबर कोण आलं आहे ? इथं तर तुझ्या–माझ्याशिवाय दुसरं कुणीच दिसत नाहीं.

माध०:–ताई ! माझ्याबरोबर आलेलं मनुष्य लौकरच तुझ्या दृष्टीस पडेल. पण ताई, आधीं तूं मला एक वचन दे.

तारि०:–दादा, तूं असं काय करितोस ? तूं घाबरतोस काय म्हणून ? माझ्यापासून का तुला कसली भीति आहे ? वचन कशाला हवं ? तूं आजवर माझ्याजवळ असं वचन कधीं मागितलं होतंस का ?

माध०:–नाहीं, पण आजचा प्रसंग तसाच आहे म्हणून मागतों, त्याची मला क्षमा कर. पण ताई, वचन दे !

तारि०:–बरं. वचन मागितलंस म्हणून काय झालं ? आणि त्याकरितां क्षमाच मागायला कशाला हवी ? हें घे वचन. आणि माझ्याजवळ मन मोकळं करून खुशाल बोल.

माध०:–( मनांत ) ताईचा मला कधीं तरी अविश्वास वाटेल का ? पण तिची स्वामिभक्ति इतकी उत्कृष्ट आहे, कीं मीं आपल्याबरोबर आणलेलं मनुष्य खरोखर कोण आहे हें तिला कळलं, तर तिचा आनंद पोटांत मावणार नाहीं. बरं, पण हें मनुष्य कोण हें हिच्यापासून लपवून ठेवलं तर तिला भलताच एखादा संशय यावयाचा. काय करावं ? दोन्ही-कडून अडचणच !

तारि०:—दादा, अजूनही तूं विचारांतच? दादा, देवा शपथ; तुला मला सांगायचं असेल तितकंच सांग. जें सांगशील तें मी प्राणापलीकडं जतन करून गुप्त ठेवीन. आणि जें न सांगशील तें समजावं अशी कितीही उत्कट इच्छा झाली तरी मी तें विचारणार नाहीं. हीच शपथ! मग आतां तर झालं ना?

माध०:—ताई, गुन्हा माफ कर. माझ्या मनाची स्थिति अशी कावरी-बावरी कां झाली हें मला या क्षणीं सांगतां येत नसलं तरी पुढंमागं लौकरच तुला कळून येईल.

तारि०:—दादा, पण राहूं दे ना आतां! मनाला किती वाईट वाटून घेशील? सांग आतां तुझ्याबरोबर कोण आलं आहे तें!

माध०:—चल. या टेकडीच्या पायथ्याच्या झाडीकडे चल, म्हणजे कोण तें तुझ्या आपोआप दृष्टीस पडेल.

तारि०:—(मनांत) हें काय गूढ आहे कांहीं कळत नाहीं. (उघड) दादा चल लौकर, तुझ्याबरोबरचं मनुष्य पहाण्याची मला फार उत्कंठा लागली आहे.

माध०:—चल तर, मलाही तें माणूस तुझ्या स्वाधीन केव्हां करीन असं झालं आहे. [दोघें जातात.]

## प्रवेश पांचवा.

स्थळ—आनंदभुवनाजवळील अरण्य.

[हरनंद प्रवेश करतो.]

हर०:—दुर्दैव हा जर एक कवि असला, तर त्याला विरोधाभास हाच अलंकार अत्यंत प्रिय असला पाहिजे. एरवीं जगांत तो इतक्या विलक्षण विपरीत गोष्टी घडवून आणता ना! माझंच पहा! सर्व भरतखंडांतील क्षत्रियांमध्यें अग्रगण्य अशा नंदवंशाचा एकटा एक उरलेला आधारस्तंभ मी! असं असतां तोच मी, आज हातचं राज्य गमावून स्त्रीवेष धारण करून, चोरट्यासारखा लपत आणि दडत, रानांतून भटकत अज्ञातवासांत

काळ काढतों आहें! माझ्या क्षात्रकुलीनत्वाच्या अभिमानाची दैवाला फजितीच करावयाची होती, तर प्रत्यक्ष स्त्री-वेष माझ्या पदरीं बांधण्यापेक्षां दुसरं एकादं कमी लाजिरवाणं साधन त्याला सुचलं नसतं का? सुचलंही असतं, पण एरवीं दैवाची लीला कशी रंगणार? अरेरे, काय करूं? पुष्कळ वेळां वैताग येऊन असं वाटतं, कीं हा अपमानास्पद वेष टाकून द्यावा आणि तरवार घेऊन बाहेर पडावं. मग जें काय होणार असेल तें होईल. पण माधवाच्या राजनिष्ठेमुळं हे प्राण वांचले; आणि माझे प्राण काय वाटेल तें करून वांचवायचे असा त्याचा संकल्प होऊन चुकला असल्यामुळं, त्याच्या इच्छेआड मला जातां येत नाहीं. अशा परम स्वामि-भक्त मित्राची इच्छा सफळ करण्यापलीकडं, त्याला बक्षीस असं द्यायला माझ्याजवळ दुसरं काय उरलं आहे? अरे, ही चाहूल येत आहे इकडून. तो माधव येत असेल काय? पण न जाणों, भलताच कुणी असला तर? तो कोण हें दिसेपर्यंत या जाळींत दडून बसावं. [जाळीच्या आड जातो.]

[पडद्यांत माधव म्हणतो—माधवी, ये, बाहेर ये. भिऊं नकोस आणि लाजूंही नकोस. हें पहा, प्रेमाला भेटायला मूर्तिमंत प्रेमच चालत आलं आहे.]

हर०:–(थोडासा पुढं येऊन) होय, हा माधवच. अरे, पण ही याच्या-बरोबर कोण? अहाहा! काय हिचं हें अप्रतिम लावण्य! पण अशा स्त्रीसमोर उभा राहून तिच्या स्वरूपाचं आकंठपान करण्याऐवजीं मी स्वतःच तोंडावर बुरखा घ्यावा अशी स्थिति आली आहे खरी. घेतला पाहिजे! करणार काय? [माधव व तारिणी प्रवेश करतात.]

माध०:–(तारिणीस) ताई, हें पहा माझ्याबरोबरचं माणूस! हें मी ठेव म्हणून तुझ्या स्वाधीन करितों.

तारि०:–(स्वगत) दादानं ही कोण सुंदर स्त्री बरोबर आणली असावी बरं? राजघराण्यांतल्या एखाद्या स्त्रीवर याचं प्रेम बसलं असेल काय? पण मला पाहिल्याबरोबर हिनं डोक्यावरचा बुरखा ओढून कां बरं घेतला? हिला माझी भीति कशाची वाटली?

माध०:–(तारिणीस) ताई, विचार कसला करतेस?

तारि०:–विचार? होय. विचार इतकाच, कीं अशा थोर मनुष्याचं स्वागत मी कोणत्या शब्दांनीं करूं? यांचा योग्य तो सन्मान ठेवण्याचं

काम मला कसं काय साधेल ? माझ्या हातून नकळत कांहीं चूक तर होणार नाहीं ना ? हाच विचार मी करीत होतें. [ तीं दोघें कुजबुजतात. ]

हर०:–अरे, ही मला नुसतं थोर मनुष्य असं मोघम म्हणाली, स्त्री असं म्हणाली नाहीं. माधवानं इला माझी खरी हकीकत सांगितली आहे कीं नाहीं कोण जाणे ! वास्तविक इच्या सहवासांत मला भीति कशाची ? पण कांहीं असो. माधवाकडून दुसरी इशारत मिळेपर्यंत या स्त्री-वेषाची बतावणी बिनचूक केली पाहिजे.

तारि०:–माधवीबाई, आमचं नशीब थोर, म्हणून आपल्यासारख्यांचे पाय आमच्या आनंदभुवनाला लागणार ! या वनांत उगवणाऱ्या पुष्पांनींच मी आपलं प्रथम स्वागत करितें.

[ जवळच्या वेलीवरचीं फुलें तोडावयास जाते. ]

माध०:–( हरनंदास हलक्या स्वरानें, व मधून मधून तारिणीच्या वाटेकडे पहात पहात. ) महाराज, ताईजवळ मीं आपली खरी हकीकत सांगितलेली नाहीं. आपणाला ताईशीं खेळीमेळीनं बोलण्याला संकोच वाटेल; तिच्यापासून आपणाला हात दोन हात दूर अंतरावरच राहून केव्हां झालं तरी बोलावं लागणार हें खरं. तरी पण तिच्याशीं बोलण्याचा परिपाठ आपणाला ठेवलाच पाहिजे. उलट आपण मर्यादेबाहेर संकोच धराल, तर तिला शंका मात्र येईल. मी आपणाला ताईच्या स्वाधीन करतांच बाबांना एकवार भेटून आनंदभुवनांतून निघून जाणार. आपल्या कायमच्या संरक्षणाची कांहीं तरी व्यवस्था मला लवकर केलीच पाहिजे. आम्हीं सर्वांनीं जरी आमच्या प्राणांचा करंडा करून त्यांत आपणांला घालून ठेवलं, तरी आपल्या मागं चंद्रगुप्ताचे दूत फिरत आहेत, म्हणून आनंदभुवनांत आपणाला फारच थोडे दिवस राहतां येईल. पण तेवढ्या थोड्या दिवसां-करितां आपणाला सोंगाची बतावणी करून वेळ मारून नेली पाहिजे !

हर०:–( त्रासून ) तें सर्व खरं. पण मी पुरुषासारखा पुरुष असतां स्त्रीसारखा बोलूं तरी कसा ? कोण ही माझी लाजिरवाणी स्थिति ! ज्या प्राणांकरितां भिऊन हा स्त्री-वेष मीं घेतला ते मला पूर्वीच सोडून जाते तर ही विटंबना तरी टळली असती !

माध०:—महाराज, आहे ही स्थिति चांगली असं मी म्हणत नाहीं. पण नदींत नाव एकदां घातली खरी. तिच्या सहाय्यानं आतां कसं तरी परतीर गाठलं पाहिजे. हं, मन घट्ट करा. ती पहा, ताई आलीच परत.

[ तारिणी पुष्पगुच्छ घेऊन परत येते. ]

तारि०:—( स्वगत ) मी दूर गेल्यानं दादाला आणि या स्त्रीला मन मोकळं करून बोलतां तरी आलं क्षणभर! ( हरनंदास ) माधवीबाई, आनंदभुवनाच्या या जीर्ण उद्यानभूमींत, आपल्या राजधानींत नेहमीं मिळणारे, सुंदर व सुवासिक पुष्पांचे हार वाटतील तेव्हां कसे मिळणार? म्हणून असल्या या रानवेलीच्या फुलांनींच आपलं स्वागत मला करावं लागतं याची क्षमा करा.

माध०:—( हरनंदास हळूच ) महाराज बोला, बोला; दोन शब्द कसे तरी बोलाच. म्हणजे ताईला बरं वाटेल.

हर०:—( स्वगत ) स्त्रीवेषांत भाषण करण्याचा माझा हा पहिलाच प्रसंग आहे. कसा काय निभावेल तो खरा! ( उघड पण किंचित् स्वर ओढून ) ताईसाहेब, रानवेलींचीं फुलं यापुढं मला मिळालीं तरी तींसुद्धां पुष्कळच म्हटलीं पाहिजेत.

तारि०:—(स्वगत) ही बोलली खरी, पण अजून जरा गांगरलेलीच दिसते. पण पहिलीच भेट, शिवाय दुःखीकष्टी. तिला अधिक बोलण्याचे श्रम देणं नीट नाहीं. (उघड) माधवीबाई, पहिल्याच भेटींत आपणाला बोलायला संकोच वाटावा हें योग्यच आहे. पण मी तुम्हांला केवळ प्रेमभावानं विनवितें, कीं माझा दादा नी मी कांहीं दोन नाहींत. माझ्याशीं अगदीं मन मोकळं करून वागलं पाहिजे बरं का? त्याचं माझ्यावर जसं प्रेम आहे तसंच तुमच्चंही असलं पाहिजे. [ तारिणी व माधव कुजबुजतात. ]

हर०:—( स्वगत ) अहाहा! हे सुंदर स्त्रिये, माझ्यावर प्रेम करा असं तुला विनवायचं कारणच नाहीं. मला तुझं प्रथम दर्शन घडलं त्याच वेळीं तूं माझ्या हृदयांत आपलं ठाणं बसविलंस. माझं तुझ्यावर प्रेम आहे, पण माधवाच्या प्रेमाची जात वेगळी आणि माझ्या प्रेमाची वेगळी. त्याला मी काय करूं?

माध०:–(हरनंदाकडे जाऊन हळूच) महाराज, ठीक आहे. झालं इतकं बरंच निभावलं. पण अजूनही आपण थोडा संकोच कमी केला पाहिजे.

तारि०:–( स्वगत ) दोघंही विचारानं आणि लाजेनं अजून थोडीं गांगरलेलींच दिसतात, तर आतां आपणच यांची लाज राखली पाहिजे. ( उघड ) पण दादा, मी किती वेडी ! माधवीबाई आमच्या घरीं आज नव्यानं पाहुण्या आलेल्या, त्यांना लवकर घरीं घेऊन जाऊन त्यांच्या जेवणाखाणाची व्यवस्था मला केली पाहिजे. तें सोडून मी त्यांना इथंच बोलवीत काय उभी राहिलें ! चल. दादा, तुलाही फार भूक लागली असेल. शिवाय बाबाही तुझी वाट पाहात बसले आहेत अगदीं. चला, माधवीबाई चला. माझ्यामागून हळूच जपून या बरं का ! [ सर्व जातात. ]

## प्रवेश सहावा.

स्थळ–चंद्रगुप्तराजाचा खास दिवाणखाना.

[ चंद्रगुप्त व वीरसेन प्रवेश करितात. ]

चंद्र०:–काय समजलास वीरसेना ? मी येईपर्यंत सर्व बंदोबस्त राहण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. तुला सावधपणानं वागलं पाहिजे. कारण नंदपक्षाचे सर्व लोक जरी जमीनदोस्त झाले आहेत तरी न जाणो, अमात्य राक्षस नाहीं तेंच एखादं दुसरं कारस्थान उपस्थित करावयाचा.

वीर०:–महाराजांनीं इकडची बिलकुल काळजी करूं नये. अगदीं स्वस्थ, मोकळ्या मनानं शिकारीला जावं. अमात्य राक्षस कारस्थानी असला तरी नखं व दांत काढलेल्या सिंहासारखा तो आतां पुरा निरुपद्रवी झाला आहे.

चंद्र०:–तसंच हें बघ वीरसेना, गुरुमहाराज तपोवनांतून तपश्चर्या लवकर आटोपून आले तर मला ताबडतोब कळीव. ते आले आणि मी नसलों म्हणजे नीट नाहीं. सेवेंत अंतर पडावयाचं ! ते परत येईपर्यंत त्यांचा आश्रम आणि वृक्षवाटिका सर्व नीट स्वच्छ करून ठेवीव.

वीर०:–गुरुमहाराज अवचित लवकर परत आले तर महाराजांकडं निरोप पोंचवायला सांडणीस्वार मी लगेच रवाना करीन. पण सरकारस्वारी शिकारीला कोणच्या अरण्यांत जाणार तें मला अजून कळलं नाहीं.

चंद्र०:—नाहीं खरंच. पण वीरसेना, कांहीं कारणाकरितां मला माझ्या शिकारीचा ठावठिकाणा कुणालाच कळवायचा नाहीं. तरी पण प्रसंगविशेषीं अगदीं जरूरच पडली तर तो तुला एकट्याला कळावा अशी योजना मीं केली आहे. हें घे मोहोरबंद पत्र. (पत्र देतो.) यांत कोणत्या ठिकाणीं मी तुला आढळेन हें लिहून ठेवलेलं आहे. पण अगदीं नाइलाज होईल, मला भेटल्याशिवाय गत्यंतरच नाहीं, असं दिसेल तेव्हांच तूं हें मोहोरबंद पत्र फोडून वाच. दुसरं तिसरं कांहीं नाहीं. पण माझ्या स्वच्छंदी शिकारीला कोणींही विनाकारण व्यत्यय आणूं नये येवढीच माझी इच्छा आहे.

वीर०:—आणि महाराज, हरनंद नाहींसा झाला आहे त्याला माझ्या लोकांनीं हुडकून धरून आणला तर काय करायचं त्याचीही पण आज्ञा व्हावी.

चंद्र०:—हरनंद बहुधा लवकरच हस्तगत होईल. पण त्याचं काय करायचं हें गुरुमहाराजांनीं ठरवायचं असल्यामुळं, ते येईपर्यंत त्याला तूं बंदींत ठेव म्हणजे झालं. याहून जास्त कांहीं नाहीं.

वीर०:—(वंदन करून) ठीक आहे जशी आज्ञा. मी घेतों रजा तर.

चंद्र०:—जा, सर्व बंदोबस्त नीट ठेव. (वीरसेन जातो.) गुरुमहाराजांजवळ मी प्रतिज्ञा तर करून चुकलों खरा. पण पुढं काय करावं कांहीं कळत नाहीं. माझी प्रतिज्ञा माझ्या हातून पार पडेल असं माझं मनच आंतून मला सांगत नाहीं. हा काय चमत्कार असावा बरं? आर्य चाणक्यांचं शिष्यत्व पतकरून नंदवधाची कल्पना मीं प्रथम मनांत आणली, तेव्हां मला कांहींच अशक्य वाटलं नाहीं. मी एकटा एक असतां, राज्यपदारूढ आणि पदरीं हजारों सैन्य बाळगणाऱ्या नंदांचा उच्छेद करणं मला सोपं वाटलं. आज ती अवघड गोष्ट पराक्रमानं सिद्ध करून मी स्वतः नंदांच्या जागीं राजा झालों आणि हजारों सैनिक माझ्या हाताखालीं आहेत. असं असून एकटा एक हरनंद, पण तो हुडकून काढून त्याचा शिरच्छेद मी करीन आणि त्याचं मस्तक गुरुचरणांवर वाहीन असा आत्मप्रत्यय मला कां बरं वाटूं नये? क्षत्रियाला अयोग्य अशी सदयता, अशी विचारशीलता मला कां बरं सुचूं लागली असावी? माझी प्रतिज्ञा खोटी ठरवून दैवाला माझी फजिती तर करायची नसेल? असो. कसंही असलं तरी संकेताप्रमाणं प्रथम आनंदभुवनाकडं जावं. गुरुमहाराज तपश्चर्येहून परत येण्याला

अद्यापि अवधि आहे, तोंपर्यंत आधीं चंदनदास आणि तारिणी यांच्या भेटीला जावं. पूर्वी आनंदभुवनामध्यें मी अज्ञातवासांत काळ कंठीत होतों, त्या वेळच्या आणि आजच्या माझ्या स्थितींत किती तरी अंतर पडलं आहे ! ज्या ठिकाणीं मीं रंकाप्रमाणं दिवस काढले त्याच ठिकाणीं आज राव म्हणून मला जातां येईल ! आणि खरोखरच जर मी मगधदेशचा अधिपति म्हणून राजैश्वर्याच्या सर्व अलंकारांनीं मंडित असा आनंद-भुवनाला गेलों तर तारिणीला किती आश्चर्य वाटेल ? मी अधिराज झालेला पाहून तिला किती तरी आनंद होईल ! पण छेः ! असले नादानपणाचे विचार माझ्या मनांत तरी कसे येतात ? तारिणीचं प्रेम असलं तर तें माझ्यावर, माझ्या ऐश्वर्यावर नव्हे. आणि तिचं माझ्यावर प्रेमच नसलं तर तिला ऐश्वर्याची लालूच दाखवून का तें माझ्यावर बसणार ? तारिणी, हीच का मीं तुझ्या मनाची परीक्षा केली ? नाहीं ! तुझा उदार, प्रेमळ स्वभाव मी कधींही विसरणार. नाहीं. तुझ्या गुणांना इतर सामान्य स्त्रियांची कसोटी लावण्याची ऊर्मि क्षणभर न कळत माझ्या मनांत आली तिजबद्दल मला क्षमा कर. तुला जशी राजैश्वर्याची किंमत मुळींच वाटत नाहीं तशीच मलाही ती वाटत नाहीं. हा पहा, तुला सोडून येण्यापूर्वी ज्या स्थितींत मी भेटलों होतों त्याच स्थितींत फिरून मी तुझं दर्शन घेणार ! ( डोक्यावरचा शिरपेंच काढून फेकून देतो. ) तूं नुसती चंद्रकांत या नांवानं मला हांक मारलीस, तर तेवढ्यानं मी धन्य होईन ! दरबारांत मला ' राजाधिराज चंद्रकांतमहाराज, ' अशा प्रचंड नांवानं संबोधणाऱ्या चोपदारांच्या ललकारणीनं, किंवा ' सर्व जगांतील श्रेष्ठ क्षत्रिय वीर ' अशी माझी स्तुति करणाऱ्या भाटांच्या वर्णनानंही मला तितकी धन्यता वाटणार नाहीं.

[ जाऊं लागतो. ]

[ बळिराम चंद्रगुप्ताच्या तोंडाकडे पहात प्रवेश करतो. ]

**बळि०**:—राजा, तुझं कल्याण असो.

**चंद्र०**:—न मागतां दिलेलाही आशीर्वाद मला प्रियच असला पाहिजे. पण कोणत्या सत्पुरुषाकडून मला तो मिळाला हें कळेल तर याहून विशेष आनंद होणार आहे.

बळि०:–राजा, सत्पुरुष म्हणून एका अनोळखी मनुष्याचा तूं गौरव केलास हें तुला भूषणास्पदच आहे. पण सत्पुरुष म्हणवून घेण्याची माझी योग्यता नाहीं. आणि तुझ्याशीं इतकं दूरचं नातं रहावं हेंही मला आवडत नाहीं. असो. राजा, तुला दर्शन देण्याचं वचन मीं पूर्वी दिलं होतं तें खरं करण्याला आज आलों आहें.

चंद्र०:–आपणाला मीं पूर्वी पाहिलेलं नाहीं, आणि आपण म्हणतां तें वचनही मला आठवत नाहीं.

बळि०:–( हंसून ) राजे लोकांची आठवण याहून अधिक घड असायला पाहिजे! परवां राजसभेंत तूं एक घोर प्रतिज्ञा करणार होतास त्या वेळीं तुला ज्यानं प्रतिबंध करण्याचा प्रयत्न केला, तोच मी. मला पाश घालून बंदिवान् करण्याची आज्ञा जेव्हां तूं सेवकांना केलीस त्या वेळीं 'हे श्रम व्यर्थ आहेत, पण पुढंमागं मी तुला भेटेन, आठवण ठेव,' असं ज्यानं तुला सांगितलं, तोच मी. राजा, तूं मला ओळखीत नाहींस याचं मला फारसं आश्चर्य वाटत नाहीं. दोनच दिवसांपूर्वीच्या प्रसंगाची आठवण जर तुला राहिली नाहीं, तर तुझ्या बाळपणची आठवण कशी राहणार?

चंद्र०:–अस्सं! आतां आठवलं! राजवचनाला प्रतिबंध करणारा तो तूंच? पण हा चंद्रगुप्त सहसा असा मायावश होणार नाहीं हें तुला कळायला पाहिजे होतं. बोल. तूं कोण आणि कुठून आलास?

बळि०:–राजा, मी कोण आणि कुठून आलों हें तुला खरं सांगितलं, तर तुझा त्यावर एकदम विश्वासही बसणार नाहीं. राजा, मीं त्या दिवशीं तुला प्रतिज्ञा करण्याला प्रतिबंध केला त्याचा तुला राग आला. पण तूंही, मला प्रश्न केल्याप्रमाणं, स्वतः कोण आणि कुठून आलास याचा विचार कर म्हणजे माझ्या प्रतिबंधाचा अर्थ तुला समजेल.

चंद्र०:–काय, मला असला प्रश्न?

बळि०:–होय राजा. राजे लोक झाले तरी तीं मनुष्यंच होत. त्यांनाही जन्म आणि बाळपण असतंच. अनादि असं या विश्वांत ईश्वराशिवाय काय आहे? राजा, तुला तुझे माता-पिता आठवतात का? तुझ्या बाळपणची तुला आठवण असली तर करून पहा!

चंद्र०:–( दचकतो, पण फिरून सांवरून ) मला ती आठवण असेल किंवा नसेल. पण माझ्या प्रतिज्ञेशीं त्याचा काय संबंध ?

बळि०:–तुला आपल्या माता-पित्यांची आठवण असेल तर प्रतिज्ञेचा संबंधही कळून येईल. माझ्या तोंडूनच तें कां वदवितोस ?

चंद्र०:–( स्वगत ) हा तेजस्वी पुरुष बोलतो यांत कांहीं तरी अर्थ असलाच पाहिजे. माझ्या माता-पितरांविषयीं शोध करण्याची जी उत्कंठा मला अहर्निश लागून राहिली आहे ती शमविण्याचं कांहीं तरी साधन खचित या सत्पुरुषाजवळ असलं पाहिजे. पण एकदम याच्या आहारीं आपण जातां कामा नये. न जाणो, अमात्य राक्षसाचं हें कांहीं कपट नसेल कशावरून ? ( उघड ) सांईमहाराज, माझ्याशीं अशीं प्रश्नोत्तरं करण्याचं धारिष्ट तुम्हीं केलं याचं मला राहून राहून आश्चर्य वाटतं. पण त्या आश्चर्यानं दिपून जाऊन मी तुमच्या कपटाला बळी पडणार नाहीं हें पक्कं लक्षांत ठेवा. राजेलोक आपल्या इच्छेविरुद्ध कोणालाही आपलं मनोगत कळवीत नाहींत. फारच झालं तर ते दुसऱ्याचं बोलणं ऐकून घेण्याला तयार होतात. तेव्हां तुम्हांला माझ्या स्वतःविषयीं काय बोलायचं आहे, काय वर्तमान सांगायचं आहे, तें थोडक्यांत सांगा. मी तें ऐकून घेण्याला तयार आहें.

बळि०:–राजा, तुझा अज्ञानरूपी अंधकार झांकून टाकण्याला राजतेजाचा उपयोग तूं केलास हें पाहून तुझ्या चातुर्याचा मला अभिमान वाटतो. ठीक आहे. तुला आपलं पूर्ववृत्त कळावं अशी खरी इच्छा असेल तर हें पत्र घे आणि नीट मनन करून वाच.

[ पत्र अंगावर टाकून देऊन एकदम निघून जातो. ]

चंद्र०:–( पत्र वाचून ) काय ? या सत्पुरुषाला माझ्या बाळपणचा वृत्तांत माहीत आहे ? मला माझ्या बाळपणीं यानं अंगाखांद्यावर घेऊन खेळविलं आणि शेवटीं माझा प्राण-नाश होणार होता तो यानंच वांचविला, असं हा म्हणतो हें खरं असेल काय ? पण खोटं सांगून याला काय मिळणार ? माझ्याकडं पाहात असतां त्याच्या मुद्रेंत द्वेष किंवा कपट कांहीं एक नव्हतं. उलट मुग्ध प्रेमाचं सात्विक तेज मात्र चमकत होतं.

खरंच, या सत्पुरुषाला पाहून माझ्याही मनांत ममत्वबुद्धि कां बरं उत्पन्न झाली ? माझ्या माता–पित्यांच्या नांवाचा स्पष्ट उच्चार हा या पत्रांत करीत नाहीं. पण ' चंद्रगुप्ता, तूं राजा झालेला पाहून तर मला आनंद होतोच, पण माझ्या अंगावर खेळणारा राजपुत्र म्हणूनच तूं मला अधिक प्रिय वाटतोस ' असं हा म्हणतो. मीं जर राजपुत्र होतों, तर मग माझ्या आठ-वर्षीतले बाळपणचे सर्व दिवस अशा अज्ञातवासांत जाण्याचं काय कारण ? लहानपणीं हिमालय पर्वतांतल्या गौळवाडयांत गेलेले दिवस मला आठवतात. पण मी राजपुत्र कसा होतों हेंच समजत नाहीं. वयानं मोठा झाल्यावर माझे दिवस या आनंदभुवनांत गेले. चंदनदासजींनीं माझ्यावर फार प्रेम केलं. पण तें मी अनाथ म्हणून, राजपुत्र म्हणून खचित नव्हे. नंतर आर्य चाणक्यांनीं माझ्यावर गुरुकृपाप्रसाद करून माझ्या हातून राज्य-क्रांतीचं हें प्रचंड काम करविलं. तरी पण मी कोणा राजाचा पुत्र असल्या-विषयीं ते कधीं बोलले नाहींत. ( फिरून हातांतलं पत्र वाचून ) ' नंदवंशाचे जिवंत उरलेले एकूण एक पुरुष मारण्याची आत्मघातकी प्रतिज्ञा करूं नको, केलीस तर मला ती निष्फळ करावी लागेल ! ' असं हा सत्पुरुष आग्रहानं कां बरं फिरून फिरून प्रतिपादतो ? ही प्रतिज्ञा आत्म-घातकी कशी ? असो. पण या गोष्टीचा विचार करून संशयग्रस्त होण्यापेक्षां आनंदभुवनाकडं जावं हेंच बरं. माझ्या जन्मासंबंधाचं गूढ उकलण्यानं मला समाधान होईलच. पण मी आनंदभुवनांतून अवचित गुप्त झाल्यानं तारिणीला जें गूढ पडलं असेल तें उकलून तिला सुप्रसन्न करण्यापासून मला अधिक समाधान होईल. ( जातो. )

## प्रवेश सातवा

### स्थळ–आनंदभुवन.

[ चंदनदास आजारी असा पलंगावर पडला आहे, जवळ तारिणी त्याची शुश्रूषा करीत बसली आहे, व स्त्रीवेषधारी हरनंद किंचित् दूर उभा आहे असा प्रवेश. ]

चंद०:–तारिणी ! माधव गेला का ग ?

तारि०:–होय बाबा, तो मघांच गेला. तुम्ही दादाला आशीर्वाद देऊन मघाशींच नाहीं का म्हणालां, कीं माधवा जा, राजपुत्र हरनंदाला होईल तितका जप, तुला आपले प्राण देऊन त्याचे प्राण वांचवितां आले तरी वांचीव म्हणून!

हर०:–(स्वगत) अहाहा! कोण यांची ही अप्रतिम राजनिष्ठा! आमच्या प्रजेचं आमच्यावर किती प्रेम होतं हें मला पाटलीपुत्राच्या राजवाड्यांत कधींही कळलं नाहीं, पण तें आज प्रत्यक्ष अनुभवाला येत आहे!

चंद०:–खरंच बाळे, मी तें विसरलों होतों. पण तूं आठवण करून दिलीस यामुळं तें सर्व पुनः आठवलं. पण नको. माझी स्मरण-शक्ति समूळ नष्ट होईल तर फार बरं. म्हणजे मनाला दुःख तरी होणार नाहीं. नंदमहाराज! तुम्ही आपल्या विश्वासू स्नेह्यांना मागं टाकून कसे हो गेलां? पण मी त्यांना दोष कसा देऊं? ते रणांगणांत पडले; त्यांच्या शरीराचं सोनं झालं. पण मी मात्र असा मागं जिवंत राहून मेल्याहून मेल्यासारखा झालों आहें. तारिणी! मला राहून राहून असं वाटतं, कीं या नखांनीं या अभागी शरीराचे तुकडे तुकडे करून कोल्ह्याकुत्र्यांना खाऊं घालावे. म्हणजे नंदमहाराजांच्या मृत्यूची बातमी ऐकण्याला जिवंत राहण्याचा जो मीं अक्षम्य गुन्हा केला आणि कृतघ्न बनलों त्याची थोडी तरी निष्कृति होईल.

तारि०:–बाबा! असं कां बरं बोलतां? गुन्हा कसला आणि कृतघ्नता कसली? तुम्ही आज इतके दिवस आंथरुणाला खिळून पडलेले आहां; तुम्हांला इकडचा हात इकडे करवत नाहीं. तुमची प्रकृति जर सुदृढ असती, तर माधवदादाबरोबर तुम्हीही नसतां का रणांगणावर गेलां?

हर०:–(स्वगत) तारिणी स्त्री आहे तरी तिच्या अंगचं तेज राजनिष्ठ योध्यांच्याही तेजाला हार जाणार नाहीं. असली स्त्री ज्याला जन्माची लाभेल तो किती तरी भाग्यवान्!

चंद०:—होय बाळे. माझी प्रकृति सुदृढ असती तर मी वृद्ध असूनही खचित रणांगणावर गेलों असतों. आणि नंदमहाराजांना जी उत्तम गति मिळाली, तीच मलाही मिळाली असती. अहाहा!

जिवलग स्नेह्यांबरोबर हातांत हात घालून रणांगणावर मरणं, यांत जितकं भूषण, तितकंच सुखही पण आहे.

तारि०:–होय बाबा. आणि तशा स्थितींत, तुम्ही मला सोडून गेल्याबद्दल जरी मी रडलें असतें, तरी मरतांनाही तुमच्या हातून राजसेवाच घडली या विचारानं माझं सांत्वन झालं असतं. पण या गोष्टी आपल्या हातच्या कुठं आहेत ?

चंद०:–असो. देवानं मला इच्छामरणी केलं नाहीं ! पण तारिणी, आतां मला या घरांत राहूं नये असं वाटतं. यांतल्या प्रत्येक वस्तूकडं पाहून मला नंदमहाराजांची आठवण होते ग ! ज्या ज्या वस्तूकडे दृष्टि जाते, ती ती जशी कांहीं माझी निंदाच करीत उठते आणि म्हणते, ' हा अधमा ! माझ्याकडं पाहून नंदमहाराजांच्या औदार्याची तुला आठवण होत नाहीं काय ? आणि होत असली, तर तूं अद्यापि जिवंत तरी राहिलास कसा ? ' तारिणी, हें आनंदभुवन सोडून दूर कुठं तरी जावं असं मला वाटतं.

[ मान टेकून बेसावध होतो. ]

तारि०:–अरेरे ! बाबांना झीट आली वाटतं. माधवीबाई, तुम्ही जरा बाबांच्या जवळ उभ्या रहा. मी बाबांचं औषध तयार करून घेऊन येतें.

[ जाते. व्यतिपात प्रवेश करतो. ]

व्यति०:–पुढें होणाऱ्या गोष्टींचीं यांना स्वप्नंच पडत होतीं म्हणायचीं. आनंदभुवन सोडून जाण्याचीच यांची तयारी होती एकूण ! अहो वृद्ध कपि ! तुमच्याप्रमाण मलाही वाटतं, कीं तुम्हीं आनंदभुवन सोडून जावं. नाहीं, माझा तुम्हांला तसा हुकूम आहे.

हर०:–( स्वगत ) अरे, हा विक्षिप्त वेषधारी मनुष्य कोण ? आणि या थोर माणसाला हा असं टाकून बोलतो, याचं काय कारण ? पण क्षणभर गप्प रहावं म्हणजे कळेल आपल्या आपण काय तें.

चंद०:–( सावध होऊन ) कोण आहे तें तिकडं ?

व्यति०:–अहो वृद्ध कपि ! तुम्हांला आनंदभुवन सोडून जावंसं वाटतं ना ? ठीक आहे. त्यालाच मदत करावयास मी आलों आहें.

चंद०:–कोणरे बाबा तूं मनकवडा ? किंवा तुला परमेश्वरानंच पाठविलंस वाटतं.

व्यति०:—परमेश्वर कशाला पाहिजे असल्या गोष्टींत खालीं उतरायला? मी चंद्रगुप्त राजाचा अधिकारी आहें. तुम्हीं आनंदभुवन आत्तांच्या आत्तां माझ्या स्वाधीन करावं असा तुम्हांला हुकूम आहे.

हर०:—(स्वगत) काय? या विक्षिप्त वेषाच्या मनुष्यानं ही काय थट्टा आरंभिली आहे? कीं हा जमीचा हुकूम खरोखरच सुटला आहे?

चंद०:—(बरळत) चंद्रगुप्त कोण? आणि तो राजा केव्हां झाला?

व्यति०:—चंद्रगुप्त कोण? चंद्रगुप्तमहाराजांसंबंधानं असलं अपमानास्पद उद्गार काढणारी ही तुझी जीभ इथच छाटायला पाहिजे. पण जाऊं दे. तुझ्या म्हातारपणाकडं पाहून मी तुला हा गुन्हा माफ करतों.

हर०:—(स्वगत) मी नंदवंशांतला राजपुत्र या ठिकाणीं हजर असतां या राजनिष्ठ सरदाराचं रक्षण करण्याचं काम केवळ त्याच्या म्हातारपणामुळं उत्पन्न होणाऱ्या दयेवरच खचित पडलं नसतं.

व्यति०:—काय म्हणे चंद्रगुप्त राजा केव्हां झाला? आर्य चाणक्याच्या आशीर्वादानं आणि चंद्रगुप्तमहाराजांच्या पराक्रमानं तुझे माजी नंदमहाराज पोटच्या पोरांच्या खिल्लारासकट खाटिकखान्यांतल्या गुरांप्रमाणं चराचर कापून निघाले, तेव्हांच चंद्रगुप्त हें महाराज झाले. समजलास?

हर०:—(स्वगत) अरेरे! हा स्त्री-वेष आणि माधवानं घातलेली शपथ माझ्याआड येते. नाहीं तर अभद्र बोलणाऱ्या या हलकट मनुष्याला मीं जागच्या जागींच चराचर कापून काढलं असतं.

चंद०:—(दुःखानें) काय? नीचा, हें तूं काय बोलतोस? हाय! हाय!

व्यति०:—जें खरं आहे तेंच बोलतों. जें प्रत्यक्ष घडलेलं या डोळ्यांनीं पाहिलं तेंच बोलतों, समजलास? या आनंदभुवनांतल्या आनंदी आनंदांत चंद्रगुप्तमहाराजांनीं केलेल्या भयंकर राज्यक्रांतीची खबरही आली नाहीं ऐकायला तुला? अरे थेरड्या! इकडचं जग इकडं झाल्याचं जसं कांहीं तुझ्या कानावरच आलं नसेल, नाहीं? आपलं कोंबडं पाटीखालीं दडपून घातल्यानं सूर्य उगवायचा थांबेल असं का वाटलं तुला?

चंद०:—हाय हाय! एकूण नंदमहाराज स्वर्गवासी झाले ही गोष्ट ऐकली, ती खरी तर? पण असली अभद्र बातमी खोटी कशी होणार?

व्यति०:—तुझे नंदमहाराजचसे काय, पण राजमंडळाच्या एकूण एक माणसांना चंद्रगुप्तमहाराजांनीं आपल्या हातानं कंठस्नान घालून स्वर्गाला— छेः, पण चुकलों—नरकाला पाठविलं, समजलास? आणि तुलाही त्यांच्या-मागोमाग जायचं असेल, तर चल, वाट सुधार आपली. नरकाचे दरवाजे कुणाही प्राण्याच्या मार्गांत कधींही लावून घेतलेले नसतात!

हर०:—( स्वगत ) अरेरे, काय करूं? या चांडाळाला त्याच दरवाजां-तून, स्वतः त्याच्याकरतां वाढून ठेवलेला नरक हुडकून काढण्याकरितां आत्तांच्या आत्तां पाठविलं असतं. पण अजूनही थोड दमानं घ्यावं हेंच बरं.

व्यति०:—पण चल. नरकांत जा नाहीं तर महानरकांत जा, हें आनंदभुवन आधीं खालीं करून माझ्या स्वाधीन कर, आणि मग तुला दाही दिशा मोकळ्या आहेत.

चंद०:—बरोबरच आहे. कृतघ्नपणाच्या अंतीं नरक ठेवलेलाच असणार! नंदमहाराजांचा असा भयंकर रीतीनं शेवट झालेला कानांनीं ऐकल्यावरही मी जिवंत राहिलों; तेव्हां या कृतघ्नतेला खरोखर नरकाची शिक्षाच पाहिजे. पण अरेरे! हे प्राण या देहाला अद्यापि सोडीत नाहींत ना? काय करूं?

व्यति०:—तुझे प्राण देहाला न कां सोडीनात? मला तुझ्या प्राणांशीं कांहीं कर्तव्य नाहीं. तुझ्या देहानं हें आनंदभुवन माझ्या स्वाधीन केलं म्हणजे माझं काम झालं! पण तसं जर न होईल तर आनंदभुवनांतनं तुझा देह आणि तुझ्या देहांतनं तुझे प्राण एकदमच मला बाहेर घालवावे लागतील. समजलास? [ तारिणी प्रवेश करिते. ]

चंद०:—तारिणी, माधवी, चला आत्तांच्या आत्तां हें आनंदभुवन सोडून आपण जाऊं.

तारि०:—कोण आहेस रे तूं? आणि इथं येऊन ही वटवट काय लावली आहेस?

व्यति०:—अरे वः! चोर तो चोर आणि शिरजोर? मी कोण आणि इथं कां? पण पोरींनो, मीच तुम्हांला विचारतों, कीं तुम्ही आणि तुमचा बाप इथं कां अजून? सर्व नंदपक्षपाती लोकांचीं घरंदारं आर्य चाणक्यांच्या

आणि महाराज चंद्रगुप्तांच्या आज्ञेनं जप्त झालीं आहेत. आणि हें आनंद-भुवन सोडून तुम्हीहि आत्तांच्या आत्तां चालते व्हा. नाहीं तर पहा.

[ तरवार उपसतो. ]

हर०:–( स्वगत ) मी पुढं होऊं का ?

तारि०:–हा नीचा ! [ कांतिवर्मा प्रवेश करितो. ]

कांति०:–( व्यतिपातास उद्देशून ) हा नीचा !

व्यति०:–काय कांतिवर्मा, तुम्हीही मला नीच म्हणतां ?

कांति०:–मीं तुला नीच म्हटलं तेंच बरोबर. मीं आड राहून तुझं सर्व बोलणं ऐकलं. तूं स्थानिक अधिकारी असलास म्हणून काय झालं ? या महानुभाव वृद्ध पुरुषाचा व या सन्मान्य स्त्रीचा अपमान कां केलास ? याबद्दल त्यांची आधीं क्षमा माग पाहूं !

हर०:–( स्वगत ) असो. हें संकट आयतं परस्पर वांचलं.

कांति०:–मागतोस क्षमा आधीं, कीं या तरवारीनं कापूं तुझी मान ? हं व्यतिपाता, सांग तूं यांना काय बोललास ? या वृद्ध गृहस्थांना तूं काय म्हणालास ? ( तरवार काढतो. )

व्यति०:–सांगतों. या वृद्ध गृहस्थांना मी थेरड्या असं म्हणालों.

कांति०:–किती उद्दाम हे शब्द ! अशा वृद्ध गृहस्थाला 'अहो आजोबा' असं म्हणावं ! बरं, या साध्वी स्त्रियांना तूं काय म्हणालास ?

व्यति०:–' ए पोरींनो ! ' असं म्हणालों. चुकलों खरा !

कांति०:–किती अपमानकारक हे शब्द ! अशा सभ्य स्त्रियांना 'अहो बाईसाहेब' निदान 'अहो ताईसाहेब' असं म्हणावं ! बरं, नंदराजांचं काय झालं म्हणून तूं यांना सांगितलंस ?

व्यति०:–' चंद्रगुप्तमहाराजांनीं त्यांना गुरांप्रमाणं चराचर कापून काढलं ' असे शब्द माझ्या तोंडून गेले खरे !

कांति०:–किती क्रूर शब्द हे ! नंदांना चराचर कापले असं न म्हणतां 'नंदमहाराजांचा चंद्रगुप्ताकडून सशस्त्र वध झाला !' असं म्हटलं असतंस तर तुझी जीभ काय झडली असती ? बरं, आनंदभुवन सोडून जाण्यासंबंधानं या सन्मान्य लोकांना तूं कोणच्या शब्दांनीं आज्ञा केलीस ?

व्यति०:-'आनंदभुवन सोडून एकदम चालते व्हा' असं म्हणालों खरा! माझी चूक झाली.

कांति०:-किती मगरूरपणाचे हे शब्द! 'आनंदभुवनावरून आपलं स्वत्व यापुढं नष्ट झालं हें कळविण्याला, किंवा कानावर घालायला मला फार दुःख होतं. तेव्हां आतां आपण या हतभागी स्थानाचा त्याग करून दुसरं एखादं स्थान मंडित करावं' असं म्हटलं असतंस, तर तुझ्या पदरचे काय तीन चव्वल खर्च झाले असते?

तारि०:-( कांतिवर्म्यास ) काय रे? तुझं बोलणं शिष्टाचाराचं दिसतं, पण तुझ्या बोलण्याचं तात्पर्य तेंच आहे!

कांति०:-होय ताईसाहेब, मी याला शिष्टाचार शिकवितों.

तारि०:-( व्यतिपाताला ) आम्हांला आनंदभुवन सोडून जाण्याचा हुकूम आहे म्हणतोस तो कोणीं केला? आणि तो कशाकरितां?

[ पडद्यांत पूर्वीची दवंडी होते. ]

व्यति०:-ऐकलंत ताईसाहेब? यांत काय तें समजा. त्यांतूनही राजमुद्रांकित हुकूमच पाहिजे असेल तर हा पहा. हाय! हाय! आपणांसारख्या सज्जन व उदार मनुष्यांवर असला प्रसंग यावा ना? माझं तर काळीज विदीर्ण होतं. पण करणार काय? राजाज्ञा शिरसा वंद्य करून जशी मला ती पाळली पाहिजे तशीच आपणालाही शिरसा वंद्य असली पाहिजे. फार काय, पण अयोग्य वाटली तरी ती पाळली पाहिजे. करणार काय? राज्यक्रांति होऊन चंद्रगुप्त राजा झाला खरा!

चंद्र०:-तारिणी, तूं या मूर्खाच्या नादीं काय लागली आहेस? हा कितीही सभ्यपणानं बोलला तरी चंद्रगुप्त हा नंदांच्या जागीं या मगध देशाचा राजा झाला असंच म्हणणार! पण हें ऐकण्यापेक्षां माझ्या कानांत शिसं तापवून कोणी कां ओतीत नाहीं? असो. नंदमहाराजांच्या बरोबरच या आनंदभुवनांतला आनंद मावळला. आतां चंद्रगुप्ताचा हुकूम असो, नाहीं तर नसो. हा पहा. मी चाललों—मला यापुढं आनंदभुवनांत रहायचंच नाहीं. चला. [ चंद्रगुप्त प्रवेश करतो. ]

तारि०:-( आनंदानें ) कोण चंद्रकांत? तुम्ही केव्हां आलां? ईश्वरानंच गाऱ्हाणं ऐकलं म्हणायचं!

हर०:-( स्वगत ) अरे, हा तरुण वीर कोण ?

चंद्र०:-चंदनदासजी ! तारिणी ! ही काय गडबड आहे ? ( व्यतिपातास उद्देशून ) कायरे तूं कोण ? आणि या ठिकाणीं येऊन असा उपद्रव कां मांडला आहेस ?

व्यति०:-( एकीकडे कांतिवर्म्यास ) कसं काय गुरुजी ? आतां कोण पुढं ? गुरु कीं शिष्य ?

कांति०:-( एकीकडे व्यतिपातास ) अरे, हें काय विचारतोस ? आधीं राग आणि मग लोभ !

व्यति०:-पण मी विचारतों, तुम्ही तरी कोण हो मोठे इंद्राचे ऐरावत ? आम्हांला विचारणार तुम्ही कोण ? आम्ही राजाचे सेवक आहों. त्याची आज्ञा अमलांत आणायला आम्ही आलों आहों इथं !

चंद्र०:-कोणत्या राजाची आज्ञा ?

व्यतिः-( हंसून ) कोणत्या राजाची आज्ञा ? हः हः हः ! कांतिवर्मांजी, पहा पहा ! हा गृहस्थ संभावितासारखा दिसून फिरून विचारतो, 'राजा कोण ?' एखाद्या वेळीं एखाद्या देशावर शंपन्नास राजे असतात जसे कांहीं ! कळलं, कळलं आपलं शहाणपण. चला, चालते व्हा इथून. कांतिवर्माजी पडले संभावितपणाचे मोठे भोक्ते म्हणून. नाहीं तर भल्या गृहस्था, तुझी इथल्या इथं शोभा केली असती. हो, मला हलकटाला काय ? आमच्या कामांत व्यत्यय आणलास तर फुकट त्रास सोसावा लागेल. म्हणे कोणत्या राजाची आज्ञा ? चंद्रगुप्तराजाची आज्ञा, समजलास ?

कांति०:-व्यतिपाता, तुझी संवय जाणार तरी केव्हां ? फिरून याही भल्या गृहस्थाला तूं अरे जारे म्हटलंसच !

व्यति०:-मग काय याला महाराज म्हणूं ? आपली आज्ञाच असली तर याला महाराज चंद्रगुप्त असं हवं तरी म्हणतों. हो, माझं हो काय जातं ?

चंद्र०:-( स्वगत ) मला चंद्रगुप्त म्हणायला तूं कशाला पाहिजेस ? ( उघड ) कायरे, एकदम चालता होतोस कीं नाहीं या ठिकाणाहून ?

व्यति०:-गेलों असतों. पण करणार काय ? हा पाहिलात का ? आर्य चाणक्यांच्या मुद्रेचा हुकूम ?. या आज्ञापत्रावरून आनंदभुवन

जप्त करण्यांत आलं आहे. आपणच पहा हा हुकूम! मी इथला स्थानिक अधिकारी. करणार काय? एरवीं अशा सज्जन मनुष्यांना त्रास द्यायला कुणाच्या नाहीं जिवावर येणार? मला आपला अधिकार बजावलाच पाहिजे. ही कांहीं आतां नंदांची बेबंदशाही उरली नाहीं!

हर०:–(स्वगत) काय, तोंडावर निंदा केलेली ऐकून घेण्याचा प्रसंग मजवर आला ना?

व्यति०:–हें आतां चंद्रगुप्ताचं राज्य आहे!

चंद्र०:–तें मला सांगायला तूं नको आहेस! आनंदभुवन जप्तींतून खुलं करण्याचा हा पहा महाराज चंद्रगुप्ताचाच हुकूम!

व्यति०:–(स्वगत) अरेच्या! सगळाच व्यूह ढासळायच्या बेतांत आला कीं काय? पण आहे, अजूनही एक युक्ति आहे. (उघड) पण कायहो, चंद्रगुप्त हे महाराज असले तरी आर्य चाणक्य हे त्यांचे गुरु आहेत, हें आपणालाही माहीत असेलच! मग गुरूच्या आज्ञेला अधिक महत्त्व कीं शिष्याच्या? आर्य चाणक्यांनीं हातीं धरलं म्हणून चंद्रगुप्ताचं बाहुलं गादीवर बसलं! एरवीं चंद्रगुप्ताला विचारीत होता कोण?

चंद्र०:–(रागानें) तुझ्यासारख्या मूर्खाशीं बोलत बसण्यांत काय अर्थ आहे? (तरवार उपसतो.) कांतिवर्म्या, पाहतोस काय? उडीव याच्या पाठीवर कोरडे!

[कांतिवर्मा व्यतिपातास चाबकानें मारतो, व्यतिपात धांदलीनें जातो.]

चंद्र०:–बाबासाहेब, तारिणी, तुम्हांला विनाकारण त्रास झाला, याबद्दल मला फार दुःख होतं.

तारि०:–चंद्रकांत, आज तर तुम्हीं आम्हांला आश्चर्यानं थक्क करून सोडण्याच्या बेतानं आलां होतां असंच दिसतं.

चंद्र०:–तारिणी, तें कसं?

तारि०:–तें असं, कीं इतके दिवस तुम्ही आम्हांला न सांगतां सवरतां एकदम गुप्त झालां; आणि आज पहावं तों ध्यानीं मनीं नसतां एकदम प्रगट झालां. आणि तेंही आमच्यावर ऐन संकट कोसळावयाच्या वेळीं. पण आम्हांला न सांगतां गुप्त झाल्याबद्दलचा तुमच्यावरचा आमचा राग अशानं नाहींसा होणार नाहीं, बरं का!

हर०:–( स्वगत ) या तारिणीचं या तरुण वीरावर प्रेम आहे हें अगदीं उघड दिसतं. तिनं तोंडानं रागाच्या गोष्टी बोलून तें कसं लपणार ?

चंद०:–तारिणी, तूं कुणाबरोबर बोलते आहेस ? आयत्या वेळीं येऊन आमचं रक्षण करणाऱ्या महात्म्याला नीट पाहीन म्हटलं तर देवानं डोळेही धड ठेविले नाहींत.

चंद्र०:–पण बाबासाहेब, आपण माझा शब्द ओळखलाच असेल ?

तारि०:–बाबा, चंद्रकांतांचा शब्द तुमच्या ओळखीचा नाहीं काय ? इतक्या दिवसांपूर्वी मावळलेला चंद्र आज पुनः उगवला !

हर०:–( स्वगत ) आणि म्हणूनच या तारिणीची मुखकुमुदिनी विकास पावली !

चंद०:–कोण, चंद्रकांत ? अरे होय कीं ! बाळा चंद्रकांता, ये. मीं तुझा आवाज नीट ओळखला नाहीं याची क्षमा कर. ये ये, मला तुला भेटूं दे.

चंद्र०:–बाबासाहेब, यांत अपराध कसला व क्षमा कसली ? वृद्धावस्थेनं आपणांवर अलीकडं विशेष अंमल बसविला, इतकाच त्याचा अर्थ ! पण आपलं माझ्यावरचं प्रेम कमी कसं होईल ? ( चंद्रगुप्त चंदनदासाच्या पायांवर डोकें ठेवितो. चंदनदास त्याला वर उचलून आलिंगन देतो. )

तारि०:–बाबा, तुम्हीं चंद्रकांतांचा आवाज ओळखला नाहीं म्हणून अपराध झाला म्हणतां. पण चंद्रकांत आम्हां सर्वांना न सांगतां इतके दिवस नाहींसे झाले. एवढ्या अवधींत निरोप किंवा पत्रही त्यांनीं पाठविलं नाहीं आणि तुम्हांला काळजी करीत बसायला लावलं, हा त्यांच्या हातून केवढा तरी मोठा अपराध घडला ! मला वाटतं या अपराधाची तुम्हीं त्यांना मुळींच क्षमा करूं नये.

हर०:–( स्वगत ) मुळींच क्षमा करूं नये याचा अर्थ एकदम क्षमा करून टाकावी ! प्रेमाची भाषा उलटी असते म्हणतात ती अशी !

चंद्र०:–हरवलेला मनुष्य सांपडला तर त्याचं स्वागत करण्याची ही रीति तारिणी, तुझी मोठी अपूर्वच म्हणावयाची.

तारि०:–पण स्वागत करायला आधीं हरवायला कोणीं सांगितलं होतं ?

चंद०:–पण बाळे, चंद्रकांत मोठा धूर्त आहे. तो आम्हांला काळजींत लोटून गेला खरा, पण आमच्या संकटाच्या ऐन वेळीं धांवून आलाच कीं नाहीं ?

चंद्र०:—यांत धूर्तपणा कसला? योगायोग मात्र खरा. या दुष्ट माणसांनीं येऊन आपणाला पीडा देण्याच्या संधीला इथं येण्याची बुद्धि मला ईश्वरानंच दिली यांत शंका नाहीं.

तारि०:—तुम्ही ऐन वेळीं नुसते आलां, इतकंच नव्हे तर चंद्रगुप्त-महाराजांचं मुद्रांकित आज्ञापत्रही तुमच्याजवळ असायला गांठ पडली! खरंच हा योगायोग विलक्षण खरा.

चंद०:—पण कायरे चंद्रकांता! खरंच तुला हें चंद्रगुप्ताचं आज्ञापत्र कसं मिळालं? तूं कोण? आणि तो कोण? कशास काय संबंध? माझी तर बुवा अक्कल काम करीत नाहीं या कामीं!

हर०:—(मनांत) खरंच हा चंद्रगुप्ताचा कोणी सरदार माझा शोध काढायला तर आला नसेल या मिषानं? तर आतां या ठिकाणीं आपण न रहावं हेंच बरं. [जातो.]

चंद्र०:—(स्वगत) बाबासाहेबांची स्वामिभक्ति आणि तापट स्वभाव हीं मला पुरीं माहीत आहेत. मी नुसता चंद्रगुप्ताचा पक्षपाती एवढंसुद्धां त्यांना खपेल कीं नाहीं कुणाला ठाऊक? आणि मी खुद्द चंद्रगुप्त हेंच त्यांना कळलं तर काय होईल कांहीं कल्पना करवत नाहीं! पण कसंही असो, प्रथम तरी मी चंद्रगुप्ताचा स्नेही याहून अधिक एकदम सांगणं नीट होणार नाहीं. भारतीय युद्धानंतर रागानं लाल झालेल्या धृतराष्ट्राचा कोपाग्नि भीमाचा पुतळा दग्ध करून शांत झाला, तीच श्रीकृष्णाची युक्ति योजून या करारी राजभक्ताच्या क्रोधाच्या तोंडाला माझं चंद्रकांत हेंच नांव दिलं पाहिजे. (उघड) बाबासाहेब, तारिणी, चंद्रगुप्ताचं मुद्रांकित आज्ञापत्र मला कसं मिळालं आणि मी आपणापासून इतके दिवस वेगळा कुठं व कां राहिलों या सर्वांचं कारण एकच आहे. तें कोडं उकलायला फारसं कठिण नाहीं.

चंद०:—अरे वः! मग आश्चर्यात आश्चर्याची भरच म्हटली पाहिजे!

चंद्र०:—बाबासाहेब, तारिणी! मी तुम्हांला सोडून गेलों तो एका महत्त्वाच्या मित्रकार्याकरितां. मी तुमच्यापासून चोरून कशाला ठेवूं? चंद्रगुप्त हा माझा बाळपणचा मित्र असल्यामुळं त्यानं मला युद्धाच्या कामीं मदत करायला बोलावलं म्हणून मी गेलों.

चंद्र०:–काय ? तूं चंद्रगुप्ताचा बाळपणचा मित्र ?

चंद्र०:–होय बाबासाहेब. मी इथं आपल्या आश्रयाला राहिलों होतों तेवढ्या वेळेपुरत्याच चंद्रगुप्त व चंद्रकांत या दोन व्यक्ती निराळ्या होत्या. युद्धांत यशस्वी होऊन चंद्रगुप्ताला राज्य मिळालं तेव्हां मी इकडं आलों. या आनंदभुवनांत मिळणारं आपल्या समागमाचं सुख राजमंडळाच्या सुखाहून अधिक आहे, म्हणून तें फिरून सेवन करावं या हेतूनं मी इकडे यायला निघालों. येतांना अशी बातमी कळली, कीं आपण नंदपक्षाचे अभिमानी आहां, या आरोपावरून आनंदभुवन जप्त करण्याचा हुकूम आर्य चाणक्यांनीं सोडला. तेव्हां मीं चंद्रगुप्ताची गांठ घेतली, आणि माझ्या श्रमाचं आणि त्याच्या स्नेहाचं बक्षीस म्हणून आनंदभुवन मीं त्याच्याकडून आपल्याला मागून घेतलं. पण तें खरोखर आपल्याचकडं पूर्वीप्रमाणं रहावं अशा इच्छेमुळं तशा अर्थाचं आज्ञापत्र मिळविलं. आणि तें घेऊन इकडं येतों तों इथला हा प्रकार नजरेस पडला. बाबासाहेब, यापुढं आनंदभुवन आपणाला सोडण्याचं कारण नाहीं. तें वंशपरंपरा आपल्याकडं चालावं असं हें जें मीं आज्ञापत्र आणलं आहे तें आपल्या चरणांवर वहाण्याची मला परवानगी असावी.

तारि०:–चंद्रकांत ! तुम्हांला आमच्याकरितां किती तरी श्रम पडले ! तुमचे आमच्यावर फार उपकार झाले.

चंद०:–(रागानें) तारिणी ! तूं हें काय बोलते आहेस ? धिक्कार असो तुला ! काय, चंद्रगुप्ताच्या मित्राच्या श्रमाचे आम्ही कसे उतराई होऊं ? खरंच तुझी काळजी बरोबर आहे. नंदमहाराजांच्या जिवावर उठण्याला चंद्रकांताला आपलं काळीज उलटं करावं लागलं असेल हे केवढे श्रम ! नंदपक्षाच्या सैन्याची कत्तल करायला, त्यांचे निष्कारण बळी घ्यायला, चंद्रकांता तुला आणि चंद्रगुप्ताला जे कष्ट पडले त्यांचा शीण कोण कसा हरण करणार ? नंदमहाराजांचीं मुलंबाळं चराचर कापून काढणाऱ्या चंद्रगुप्ताचे व त्याच्या साथीदारांचे पाय आम्हीं आमच्या ऊन ऊन रक्तानं माखून आमच्या डोक्यानं चेपले तरी त्यांचा शीण कसा जाणार ?

चंद्र०:–बाबासाहेब, आपण खरे स्वामिभक्त. आपला सगळा जन्म नंदमहाराजांच्या स्नेहसुखांत गेला, यामुळं झाल्या गोष्टीचं आपणाला फार

घाईट वाटतं हें ठीकच आहे. आपली राजभक्ति आपणाला अतिशय भूषणास्पदच आहे. पण चंद्रगुप्त हाही माझा स्नेही; यामुळं संकटकाळीं त्याला मीं मदत करणं हें माझंही कर्तव्यच नव्हतं काय?

तारि०:—बाबा! चंद्रकांत म्हणतात हें बरोबर आहे असं मलाही वाटतं. स्नेहकार्य हें सर्वांना सारखंच महत्त्वाचं आणि प्रिय असतं.

चंद०:—पण चंद्रगुप्ताचा आणि चंद्रकांताचा स्नेह तरी केव्हां झाला?

चंद्र०:—बाबासाहेब, चंद्रगुप्त अज्ञातवासांत असतां अगदीं बाळपणापासून त्याचा माझा स्नेह जडलेला आहे. काय योगायोग असेल तो खरा. पण चंद्रगुप्त व मी अगदीं सारख्या रूपाचे, सारख्या आकाराचे, सारख्या वयाचे आणि सारख्या स्वभावाचे आहों. त्याचा व माझा स्नेह इतका निकट व अकृत्रिम आहे, कीं त्याचा व माझा आत्मा भिन्न नसून एकच आहे असं मानलं तरी शोभेल. बाबासाहेब! मी चंद्रगुप्तावर माझ्या स्वतःइतकं प्रेम करितों असं मीं आपल्याला सांगितलं तर खरंही वाटणार नाहीं.

चंद०:—चंद्रकांता, तूं म्हणतोस यावर माझा विश्वास बसावा तरी कसा? तुझा स्वभाव इतका प्रेमळ असतां तुझी आणि त्या दुष्ट चंद्रगुप्ताची मैत्री कशी झाली याचंच मला अजून आश्चर्य वाटतं.

चंद्र०:—पण बाबासाहेब! चंद्रगुप्त हा माझ्याप्रमाणं तुमच्याही सहवासांत असता तर खचित तुम्हीं त्याला कधींही दुष्ट म्हटलं नसतं अशी माझी खात्री आहे. आपण चंद्रगुप्ताला ओळखत नाहीं, पण चंद्रगुप्त आपणाला ओळखतो, आणि माझं जितकं तुमच्यावर प्रेम आहे तितकंच चंद्रगुप्ताचंही तुमच्यावर प्रेम आहे!

चंद०:—(रागानें) काय, माझ्यावर चंद्रगुप्ताचं प्रेम? आग लागो तुझ्या त्या चंद्रगुप्ताच्या प्रेमाला! अशा घातकी, दुष्ट मनुष्याचं प्रेम माझ्यावर ठेवण्यापेक्षां आपली अवकृपा दर्शविण्याला ईश्वराजवळ दुसरीं संकटं व आपत्ती काय थोड्या आहेत?

तारि०:—बाबा, तें राहीना का? चंद्रगुप्ताशीं आपणाला काय करायचं आहे? पण चंद्रकांतावर कांहीं तुम्हांला इतकं रागावायला नको!

चंद०:—(चवताळून) काय? चंद्रकांतावर मी रागावूं नको? तारिणी! ज्यानं नंदमहाराजांना अकालीं स्वर्गाला धाडलं, ज्यानं अघोर कृत्यं करून

मगधदेशाची यमपुरी बनवली; स्वतःला राज्य मिळावं म्हणून सहस्त्रावधि कुटुंबं दुःखांत बुडविलीं, त्या चंद्रगुप्ताला सहाय्य केलं असं हा चंद्रकांत आपल्या तोंडानं सांगतो, तें तूं आपल्या कानानं ऐकतेस, आणि फिरून मला साळसूदपणानं उपदेश करितेस, कीं रागावूं नये म्हणून? धिक्कार असो तारिणी तुला! (गहिंवरून) चंद्रकांतावर तुझं प्रेम आहे हें मला माहीत होतं. पण तुझ्या प्रेमानं तुला इतकी आंधळी बनविली असेल, अशी मात्र मला कल्पना नव्हती. (रागानें) तुला चंद्रकांताचा इतका पक्षपात असेल, तर जा खुशाल त्याचा हात धरून. असली राजद्रोही कारटी घेऊन मला तरी काय करायची आहे? जिला नंदवधाबद्दल माझ्याइतकं दुःख होत नाहीं, तिचा सहवास मला यापुढं कसा सुखकर होणार? चंद्रकांताचा मित्र आतां राजा झाला. तो त्याला लहानसं राज्य देणार. तेव्हां सहजच तुला त्याचं करणं बरोबर आणि माझं करणं चूक वाटणार. नंदवधामुळं माझी जी हानि झाली तिच्या मानानं, असल्या प्रेमांध अविचारी पोरीच्या हानीचं दुःख मला कांहींच वाटत नाहीं! चंद्रकांता! जा. माझ्या दृष्टीसमोर एक क्षणभरही राहूं नको. तारिणी, जा. तुझीही मला गरज नाहीं. मी वृद्ध असलों तरी माझी काळजी घ्यायला मी समर्थ आहें. नंदमहाराजांनीं आपल्या प्रेमाची खूण म्हणून दिलेल्या या आनंदभुवनावरची माझी सत्ता त्यांच्याचबरोबर लयाला गेली. आणि ती फिरून मला कोणीं दिली तरी ती आतां मला नको. मी आपला काळ आतां शिवमंदिरांत बसून एकांतांत घालविणार. नंदमहाराज, तुमच्या पायांचं दर्शन घ्यायला तुम्ही मला केव्हां हो न्याल?

[ जाऊं लागतो तोंच बेशुद्ध पडतो. तारिणी त्यास सांवरून धरते. चंद्रगुप्तही त्यास सांवरून धरण्याकरितां पुढें होतो, पण तारिणी त्यास हातानें नको अशी खूण करिते. इतक्यांत पडदा पडतो. ]

## अंक पहिला समाप्त.

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—आनंदभुवनाजवळचा रस्ता.

[ कांतिवर्मा व व्यतिपात प्रवेश करतात. ]

व्यति०:-( कांतिवर्म्याला पाहून, पण न पाहिल्यासारखें दाखवून—आपणाशीं ) मला या कांतिवर्म्याचा असा संताप आला आहे त्या दिवसापासून कीं काय सांगूं !

कांति०:- ( व्यतिपाताला पाहून, पण न पाहिल्यासारखें दाखवून—आपणाशीं ) व्यतिपातानं शेवटीं आपल्या नांवाप्रमाणं कृति केलीच. तो दृष्टीस पडला तर त्याला खाऊं का गिळूं, असं मला होईल.

व्यति०:—माझ्या तडफेनं बहुतेक सगळं काम झालं होतं. आणि आनंदभुवन अगदीं हातांत पडायची वेळ आली होती. इतक्यांत या कांतिवर्म्यानं येऊन आपल्या संभावितपणानं सगळी घाण केली. याला वाटतं मी मोठा मुत्सद्दी ! पण असल्या या पोकळ संभावितपणाला विचारतो कोण ?

कांति०:—आनंदभुवनावर स्वारी करतांना या व्यतिपाताला आघाडीला पाठवायची मला कुठली बुद्धि झाली कुणाला ठाऊक ! या गाढवाच्या तोंडावर नक्षत्र पडलं आहे जसं कांहीं. केवळ याच्या अभद्र जिभेमुळं आनंदभुवन अगदीं हातचं आलेलं गेलं.

व्यति०:—या राजश्रीनीं मला नीच म्हणून शिव्या हसडून प्रतिष्ठितपणाचा खूप आव घातला. असल्या प्रतिष्ठितपणाला विचारतो कोण ? बरं तर बरं, नाहीं तर माझ्याप्रमाणं याच्याही पाठीवर कोरडे उडण्याचा प्रसंग आला असता.

कांति०:—अभद्र बोलत जाऊं नको, असं या व्यतिपाताला मीं एरवीं कितीदां तरी सांगितलं, तें याला पटलं नाहीं. पण चाबकाच्या रट्टयांनीं मात्र तें शहाणपण याच्या अंगीं चांगलंच मुरलं असेल.

व्यति०:—मला आतां कांतिवर्मा कुठं भेटेल ?

कांति०:—आतां व्यतिपात मला कुठं भेटणार ?

[ दोघे एकमेकांकडे येतां येतां धक्का देतात. ]

व्यति०:—अरे वः !

कांति०:—अरे वः !

व्यति०:—गुरुमहाराज ! वंदन करितों.

कांति०:—शिष्योत्तमा, कल्याण ! फिरून चाबूक खाण्याचा प्रसंग न येवो हा माझा तुला आशीर्वाद आहे.

व्यति०:—आपण काय कराल तें होईल ! पण बस्स झाली ही गुरुभक्ति.

कांति०:—कां रे बाबा ? इतक्यांतच गुरुभक्तीला विटलास का ? गुरुभक्तीचं व्रत कांहीं इतकं सोपं नसतं. एवढा राजा चंद्रगुप्त, पण अजून कसा गुरूच्या अर्ध्या वचनांत आहे !

व्यति०:—चंद्रगुप्तानं गुरुभक्तीचं व्रत केलं पण त्याला राज्य तरी मिळालं. आणि माझ्या गुरुभक्तीनं मला चाबूक दिले ! चाबूक तर खाऊन झालेच; आतां डोकं मारून घ्यायचं राहिलं आहे. तेवढंही करायचं असेल तर होऊं द्या; सांगा दुसरी एखादी कामगिरी. म्हणजे तिसऱ्या कामगिरीला शिष्य असा जागेवर उरायलाच नको.

कांति०:—व्यतिपाता, बाबा वेळ का सांगून येत असते ? मला काय माहीत, कीं हा तरुण सरदार आयत्या वेळीं तिथं येईल म्हणून !

व्यति०:—मग एवढं साधं भविष्यसुद्धां जर कळत नव्हतं, तर तुला गुरूचं ढोंग करायला कुणीरे लेकानं सांगितलं होतं ?

कांति०:—बरं, आतां यापुढं आपण आपलीं नातींच पालटून टाकूं. तूं गुरु हो, आणि मी शिष्य होतों.

व्यति०:—( हंसून ) कबूल. तुझी शरणचिठ्ठी मी मान्य करितों.

कांति०:—बरं आहे. गुरुमहाराज, आनंदभुवन तर हातचं गेलं. आतां बोला, पुढं काय करायचं ?

व्यति०:-( डोकें खाजवून ) खरंच आतां पुढं काय करायचं?

कांति०:-खाजीव, खाजीव; रक्त निघेपर्यंत डोकं खाजीव. मठ्ठ डोक्यांतून रक्त हवं तितकं निघल. पण युक्ति मात्र एकही निघायची नाहीं.

व्यति०:-( डोकें खाजवीत ) आतां पुढं काय करायचं?

कांति०:-फिरून कांतिवर्म्याला शरण येऊन त्याला गुरु म्हणायचं आणि त्याच्या पायां पडायचं. दुसरं काय?

व्यति०:-पडतों बाबा पायां! किती विचार केला तरी कांहीं सुचत नाहीं. घे आपली शरणचिठ्ठी परत.

कांति०:-अस्सं. आतां कसा आलास वठणीवर? यापुढं काय करायचं तें सांगतों ऐक. आनंदभुवनाची जप्ती खुली झाली यांत आमचं नुकसान झालं खरं, पण महाराज चंद्रगुप्त आणि त्याचा गुरु तो वेताळभट यांचाही त्यांत मोठा गुन्हा घडला आहे.

व्यति०:-मग? या गुन्ह्याचं पारिपत्य कसं होईल याची काळजी आतां आम्हांला करण्याचं कारण नाहीं!

कांति०:-तर मग कोण करील? अरे, काय चंद्रगुप्त? आपल्याला आतां हें केलंच पाहिजे, कीं ही बातमी कोणीकडून तरी चंद्रगुप्ताच्या आणि चाणक्याच्या कानावर घालावयाची. महाराजांच्या सरदारांनींच राजद्रोह आरंभला आणि आनंदभुवनांत बंड केलं, अशी कागाळी आपण जाऊन केली पाहिजे. म्हणजे मोठ्या राजकारणाचं तोंड लावून दिल्याचं श्रेय आपणाला येईल. आणि बक्षिसालाही कमी नाहीं.

व्यति०:-पण हें काम करावं कुणीं?

कांति०:-मी करतों. मी जातों राजधानीला. तूं रहा या आनंदभुवनाच्या आसपास त्या राजद्रोही तरुण सरदाराच्या पाळतीवर. कोल्हा जसा गांवच्या शिवेवर शिकार शोधीत हिंडतो तसा गुपचुप हिंड, आणि जें कांहीं पहाशील आणि ऐकशील त्याची वर्दी मला देत जा.

व्यति०:-छे बुवा, तें नाहीं आपल्या हातून होणार. कोल्हा शिकार टेहळतां टेहळतां त्याची स्वतःचीच शिकार व्हायची एखाद्या वेळीं! सिंहासारखा तो तरुण सरदार आठवला कीं आपल्या तर मनाला

चटकाच बसतो. राजधानीला पत्र नेऊन पोंचवायचं किंवा दुसरं कांहीं निरोपी काम असलं तर सांग, मी तें करीन. तूंच आपला इथं रहा—आणि ( हंसून ) चाबूक खा.

कांति०:—बरं, तसंच का होईना. चल, मी तुला पत्र देतों.

[ दोघे जातात. ]

## प्रवेश दुसरा.

स्थळ—आनंदभुवनाजवळील बाग.

[ चंद्रगुप्त आपल्याशीं बोलत प्रवेश करतो. ]

चंद्र०:—मी किती तरी आशेनं आनंदभुवनाला आलों! मगध देशाचं राज्य मिळवून ऐश्वर्याचं जें मंदिर मीं बांधलं, त्यावर तारिणीच्या प्रेमाचा कळस करून बसवीन, आणि मग माझ्यासारखा सुखी जगांत मीच, असं मनोराज्य मी करीत होतों. पण दुर्दैवाला तें खपलं नाहीं! चंदनदासजींचा परवांचा तो क्रोधावेश पाहून माझं तर धाबंच दणाणलं! चंदनदासजी जर तरुण असते, तर त्यांचं माझं खचित युद्ध झाल्याशिवाय राहतं ना! त्या दिवशीं तारिणीनं माझी बाजू संभाळण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण व्यर्थ. हीं म्हातारीं माणसं करारी असतात, हा त्यांचा गुण खरा. पण त्या करारीपणाची मजल अत्याग्रहापर्यंत जाते. काय करावं! त्या दिवसापासून तारिणीची फिरून गांठ पडेल म्हणून पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण ती आनंदभुवनाच्या अंतःपुरांतून हालतच नाहीं. आणि चंदनदासजींचा क्रोध विकोपाला जाऊन त्यांना अपाय होईल, म्हणून मला त्यांच्या आज्ञेविरुद्ध आनंदभुवनांत पाऊलही घालण्याचं धैर्य होत नाहीं. काय करावं! न जाणों, माझं पुन्हां मुखावलोकनही करूं नको अशी त्यांनीं तारिणीला शपथ घातली असली तर!—पण ती भीति व्यर्थ आहे. ( आनंदानें ) ही पहा, तारिणी इकडंच आली. ( तारिणी प्रवेश करते. ) ये, ये तारिणी. मी तुझीच वाट पहात होतों.

तारि०:—पण मीं कांहीं आपणाला माझी वाट पहात बसण्याला सांगितलं नव्हतं!

**चंद्र०** :–चंद्रकांत मण्याला चंद्रोदयाची वाट पहात बसण्याला स्वतः चंद्रानं कांहीं सांगावं लागत नाहीं. जो तो आपल्या स्फूर्तीनंच वागत असतो. ये. तारिणी, तुझ्या मुखचंद्राचे किरण या चंद्रकांतरूपी संतप्त पाषाणावर पडूं देत. म्हणजे त्याला स्नेह–निर्झराचं स्नान घडून शीतळता येईल.

**तारि०** :–तोंडदेखलं बोलण्याची पुरुषांना संवयच असते. त्यांच्या भाषणांतले अलंकार खरे मानून विश्वास ठेवणाऱ्या स्त्रिया हतभागी खऱ्या ! पण एवढ्या गोष्टींत मी हतभागी नाहीं म्हणून स्वतःला धन्य मानतें.

**चंद्र०** :–तारिणी, खोटे अलंकार अंगावर घालील त्याला लोकांनीं ओळखण्याची भीति ! पण माझं बोलणं तोंडदेखलं म्हणतेस हा माझ्यावर तुझा गहजब आहे !

**तारि०** :–तोंडदेखलं नाहीं तर काय ? माझ्या दर्शनानं जर आपणाला स्नेहरसाच स्नान घडून खरोखर सुख होत असतं, तर आपण आधीं इथून निघून कां गेलां असतां ? मनुष्य हातीं असलेलं सुख टाकून देऊन जाणूनबुजून दुःखांत पडतो, हें कोण खरं मानील ? आनंदभुवन सोडून जायला आपणाला मींच सांगितलं असेल ?

**चंद्र०** :–तूं कशी सांगशील ? आणि मी तरी स्वेच्छेनं तुला टाकून कसा गेलों असतों ? पण ती वेळ तशीच होती. माझा भाग्योदय होण्याची वेळ जाणून, जणूं काय दैवानंच मला इथून लोभवून नेलं.

**तारि०** :–मग या आयत्या उगवलेल्या भाग्यसूर्याच्या सुखकारक उन्हांत खुशाल बसून काळ काढायचा सोडून, आपणांला इकडं या हतभागी आनंदभुवनाच्या रोगट छायेंत यायला कुणीं सांगितलं ? इथून जातांना माझा स्नेहपाश नाजूक फुलाच्या देंठाप्रमाणं आपणांला तट्कन् तोडून टाकतां आला. आपला भाग्यसूर्य उगवायचा होता, त्याच्या मार्गांत येणारी मी, मला आपण लाथाडून गेलांत हें योग्यच झालं. पण आपणांला सुदैवानं लोभवून नेऊन, मिळवून दिलेल्या ऐश्वर्याला लाथाडून फिरून इकडं कां आलां ?

**चंद्र०** :–तें ऐश्वर्य तुझ्या संगतीवांचून मला रुक्ष नीरस, फार काय, दुःखमय वाटूं लागलं म्हणून !

तारि०:—पण तेंच ऐश्वर्य सौख्यमय झालं असतं तर मग आपणांला माझी आठवणही झाली नसती. असंच ना ?

चंद्र०:—तारिणी, आपणाला प्रिय असलेल्या स्त्रीच्या विरहांतही पुरुषाला सौख्य देईल असं ऐश्वर्य या जगांत कोणचं असणार ?

तारि०:—नसायला काय झालं ? कारण असल्या ऐश्वर्याच्या लोभानंच आपण मला टाकून गेलां ! त्याच्याच सुखाच्या बळावर माझा विरह आपणांला सोसतां आला. आपल्या कृतीनंच आपल्या शब्दाचं खंडन झालं. मग माझ्या तोंडूनच वदवायला कशाला हवं ?

चंद्र०:—मी केवळ ऐश्वर्याच्या आशेनं तुला सोडून गेलों, हें आधीं सर्वस्वीं खरं नाहीं. शिवाय जातांना ऐश्वर्याची आशा मला असली तरी तें ऐश्वर्य एकट्यानं भोगावं अशी इच्छा माझ्या मनांत क्षणभर तरी आली असेल, असं तुला वाटतं तरी कसं ? तारिणी, तूं माझ्या मनाची हीच परीक्षा केलीस काय ?

तारि०:—कां बरं ? आपल्या ऐश्वर्याच्या ताटांत माझ्या वाटणीचा जर एखादा घास होता, तर मग 'तारिणी, मी जातों' असं मला नुसतं सांगून जायला काय हरकत होती ? आपण मला सोडून जातां त्यांत आपलं हितच आहे असं जर मला कळतं, तर मी न जाऊं देण्याचा हट्ट धरला असता का ? आपलं हितशत्रुत्व मीं कसं केलं असतं ?

चंद्र०:—छे ! छे ! तारिणी, तूं माझं हितशत्रुत्व कसं केलं असतंस ? पण इथून जातांना स्वाभिमानाच्या भरीला भरून, केवळ भयंकर धाडस मी करण्याला उद्युक्त झालेला होतों. तुझ्या विरहदुःखाचा जड पाषाण गळ्यांत बांधून अंधकारमय अशा संकटसमुद्रांत उडी घेतांना, तारिणी, मला खरोखर त्रिभुवन आठवलं ! तुझी आठवण करकरून माझ्या अपराधाबद्दल मनांत मीं सहस्र वेळां तुझी क्षमाही मागितली. पण प्रत्यक्ष तुझा निरोप घेऊन जायला माझं मनच घेईना. मी तुझा निरोप घ्यायला आलों असतों तर माझा आनंदभुवनांतून पायच निघाला नसता. फार काय ! पण तारिणी, मी कोणत्या कार्यावर नजर देऊन तुला सोडून गेलों हें स्पष्ट करून सांगण्याची या क्षणींही मला भीति वाटते.

तारि०:—बरोबरच आहे. मन खात असलं म्हणजे स्पष्ट बोलण्याची भीति वाटणारच!

चंद्र०:—हिणीव, मला खुशाल हिणीव. पण मीं हातीं घेतलेलं कार्य संकटपूर्ण, निराशामय असं जरी होतं, तरी त्यांत मनाला वाईट वाटावं असं मात्र कांहींच नव्हतं. पापमय अशा कार्यांत मला यश आलं तर त्याचं मी भूषण कसं मानीन? पापाचरणानं लाभलेल्या ऐश्वर्याची प्रतिष्ठा तुझ्यापुढं सांगेन, इतका मी अधम आहें काय? तारिणी, क्षणभर अहंकाराची ऊर्मि आली याची क्षमा कर. पण दुसऱ्याच्या अन्यायबुद्धीमुळं वनवास आणि अज्ञातवास भोगावा लागलेल्या मानी, महत्त्वाकांक्षी क्षत्रिय पुरुषाला जें योग्य तेंच काम मीं केलं. (स्वगत) पण, अरे! आवेशाच्या भरांत मी संकल्पाहून अधिक बोलून जाण्याच्या बेतांत आलों. छेः! मला राज्यपद मिळालेलं तारिणीला सांगून मजवर असलेल्या तारिणीच्या निःस्वार्थी प्रेमाची विटंबना मी कधींही करणार नाहीं. उलट चंद्रगुप्ताचा मित्र आणि नंदाचा शत्रु म्हणून तिला प्रतिपक्षीसा वाटतों ही गोष्ट तिचं प्रेम कसोटीला लावणारी आहे. म्हणून ती मला इष्टच आहे.

तारि०:—कां, आपणांला भलतंच बोलून गेल्याचा संशय आला वाटतं?

चंद्र०:—नाहीं. मीं जसं न करावं असं कांहीं केलं नाहीं, तसंच न बोलावं असंही कांहीं बोललों नाहीं. पण चंद्रगुप्ताला सहाय्य करायला मी गेलों हें मित्रकर्तव्य म्हणून, असं मीं बाबासाहेबांना पूर्वी सांगितलं तेव्हां 'मित्रकार्य सर्वांना सारखंच प्रिय असतं,' असं म्हणून तारिणी, तूंच ना माझं समर्थन केलंस? असं असतां आज तूं तें कसं विसरलीस याचाच आश्चर्यानं विचार करीत होतों, दुसरं कांहीं नाहीं!

तारि०:—वाः! या जगांत कुणावर उपकार म्हणून करण्याची सोय राहिली नाहीं. बाबांचा आपणांवर राग होऊ नये म्हणून जें मी बोललें तेंच आज मला सांगून आपण माझं तोंड बंद करणार वाटतं?

चंद्र०:—तारिणी, तुझं तोंड मी काय म्हणून बंद करीन? तुझ्या तोंडांतला प्रत्येक शब्द मला अमृतवर्षावाप्रमाणं वाटतो. या अमृतनिर्झरांत स्नान करण्याला तर मी इथं आलों आहें!

तारि०:–पण बाबांनीं आपणांशीं एक शब्दही बोलूं नको, अशी मला शपथ घातली आहे! ती नको का मला पाळायला? आपण स्वतःचे धनी असतां, माझ्यापाशीं मन मोकळं करून बोलायला आपणांला स्वतंत्रता नाहीं. मग मी तर काय बोलूनचालून कुलीन कुमारिका. स्वतःच्या मनापेक्षां पित्याची आज्ञा मला अधिक मान्य असली पाहिजे!

चंद्र०:–तारिणी, इतका वेळ झाला तरी मी तुझ्याशीं मुळींच मन मोकळं करून बोललों नाहीं असं नाहीं. पण कांहीं गोष्टी तुला अजूनही सांगूं नयेत असं मला वाटतं. तारिणी, तुझ्या आणि तुझ्या करारी पित्याच्या जाज्वल्य स्वामिनिष्ठेची मला भीति वाटते, दुसरं तिसरं कांहीं नाहीं.

तारि०:–ती कां?

चंद्र०:–मी चंद्रगुप्ताला नुसतं सहाय्य करायला गेलों, इतक्याकरितांच जर माझ्यावर बाबासाहेबांनीं इतकी आग पाखडली, तर—

तारि०:–(आश्चर्यानें) तर काय? याहून आणखी दुसरा एखादा मोठा अपराध तुमच्या हातून घडला, असं तुम्ही सांगणार आहां कीं काय?

चंद्र०:–होय. तारिणी, तुमच्या दृष्टीनं माझा अपराध याहूनही मोठा ठरेल असाच आहे.

तारि०:–पण आपण पूर्वीप्रमाणं आनंदभुवनाजवळ राहून कांहीं दिवस काढले तर फिरून बाबांची मर्जी सुप्रसन्न होईल.

चंद्र०:–पण तारिणी, यापुढं मला आनंदभुवनाजवळ पुष्कळ दिवस राहतां येईल असं वाटत नाहीं. नवीन राज्यस्थापनेचं कार्य चंद्रगुप्ताला डोळ्यांत तेल घालून केलं पाहिजे.

तारि०:–अस्सं! एकूण चंद्रगुप्त राजाचे आपण अगदीं उजवे हातच झालां आहां तर!

चंद्र०:–होय. त्याचा उजवा आणि डावा हात मीच आहें, असंच का म्हणेनास?

तारि०:–(रागावून) नंदकुळाच्या संहाराचीं कामं याच डाव्या–उजव्या हातानं चंद्रगुप्तानं केलीं असतील!

चंद्र०:–होय, तारिणी. तो पराक्रम म्हण किंवा अत्याचार म्हण तो मींच केला ही गोष्ट खरी. शिवाय मीं एक प्रतिज्ञाही केली आहे.

**तारि०**:–ती कसली ?

**चंद्र०**:–नंदवंशापैकीं उरलेल्या वच्चयावत् पुरुषांचा निःपात करीन, अशी प्रतिज्ञा आर्य चाणक्यांजवळ चंद्रगुप्ताबरोबर मींही केली आहे.

**तारि०**:–( रागानें ) अस्सं ? मग बाबा आपणांवर रागावले ते कांहीं उगीच नाहीं ! एकूण आपण पूर्वी जशीं पुष्कळ महत्त्वाचीं कामं केलीं तशींच आणखीही कांहीं करायचीं उरलीं आहेत तर ! नंदवंशापैकीं येऊनजाऊन कुमार हरनंद काय तो एकटा एक पुरुष जिवंत उरला आहे. त्याचाही वध करण्याची तुमची प्रतिज्ञा अं ! चंद्रकांत, मी काय ? बोलून चालून स्त्री आहें. मला तुमचा क्षत्रियाचा पुरुषार्थ कीं काय तो कळत नाहीं. पण मी एवढं खचित सांगतें, कीं सर्व नंदकुळाचा संहार करून चंद्रगुप्ताचं समाधान झालं नाहीं, आणि त्याच्या प्रेमाखातर हर-नंदाचा वध करण्याची तुम्हीं प्रतिज्ञा केली तेव्हां धिक्कार असो तुमच्या अविचारीपणाला ! पुरुषाचं झालं तरी, मन कठोर असण्याला कांहीं सीमा आहे कीं नाहीं ? असल्या दुष्कृत्यानं तुम्ही चंद्रगुप्ताकडून एखादं लहानसं राज्यही मिळवाल ! पण वैरबुद्धीची कड पोंचवून, रक्ताचे सडे घालून, त्यावरून चालत जाऊन सिंहासनावर बसणारे सार्वभौम राजे आणि त्यांच्या प्रभावळींत झळकणारे मांडलिक यांचं सुख त्यांनाच असो—

[ लवंगी प्रवेश करते. ]

**लवं०**:–ताईसाहेब, चला चला. माधवीबाई आपणांला लवकर बोलावताहेत. [ लवंगी जाते. ]

**चंद्र०**:–काय, ही माधवी कोण ?

**तारि०**:–चंद्रगुप्ताच्या उजव्या हाताला आमची नसती उठाठेव कां ? [ रागानें जाते. ]

**चंद्र०**:–हाय ! आतां कुठलं तारिणीचं प्रेम ?

[ खालीं बसून हातावर डोकें देतो, व पडदा पडतो. ]

## प्रवेश तिसरा.

स्थळ — आनंदभुवनाजवळचा बाग.

[ लवंगी प्रवेश करिते. ]

लवं०:—माधवदादांनीं ही कोण स्त्री पाहुणी घरांत आणली कुणाला ठाऊक ! मला तर तिचा संशयच येतो. पण असली ही नाजूक गोष्ट बोलावी तरी कशी आणि कुणाजवळ ! कांहीं कळत नाहीं.

[ कांतिवर्मा प्रवेश करितो. ]

कांति०:—कोण आहे तें तिकडं !

लवं०:—कोण म्हणजे, मी !

कांति०:—तूं ! पण कोण, स्त्री का पुरुष ?

लवं०:—इश्श, आज अगदीं ओळख विसरायला काय झालं ?

कांति०:—नाहीं, ओळख नाहीं विसरलों तुझी. तुझा चेहरा चांगला ओळखीचा दिसतो. पण तो स्त्रीचा कीं पुरुषाचा हें नाहीं कळत. तरुण आणि गोंडस पुरुषांचे चेहरे स्त्रियांच्या चेहऱ्यासारखेच दिसतात, म्हणून जरा शंका आली.

लवं०:—असली ही नाजूक शंका कधींपासून येऊं लागली आपणांला ?

कांति०:—सांगूंच तर ! ही नंद घराण्यांतली पाहुणी आपल्या या आनंदभुवनांत आल्यापासून !

लवं०:—तिनं ती अशी काय जादू केली आपणांवर ?

कांति०:—जादू नव्हे तर काय ग ! आजवर पुरुषाचा चेहरा कोणता आणि स्त्रीचा चेहरा कोणता यांतला फरक मला समजतो, अशी मोठी घमेंड होती मला !

लवं०:—इश्श ! यांत घमेंड ती कसली ? हें लहान मुलालासुद्धां कळतं.

कांति०:—जें लहान मुलालासुद्धां कळतं तें आपणां थोरांनाही कळलंच पाहिजे, अशी जी खात्री तिचंच नांव घमेंड. पण लवंगे, ही माझी घमेंड या पाहुण्या बाईनं पार जिरविली !

लवं०:—कां बरं ? ती कोण आहे असं आपणांला वाटतं ?

कांति०:–ती मनुष्य आहे एवढं खास. पण पुरुष का स्त्री, हें मात्र अजून कळत नाहीं!

लवं०:–एकूण मला संशय आला, तोच तुम्हांलाही आला आहे तर!

कांति०:–एकूण मला संशय आला, तोच तुलाही आला आहे तर!

लवं०:–खरच मला संशय आला आहे!

कांति०:–पण तो संशय यायला तुला काय कारण झालं, सांग पाहूं?

लवं०:–एखादे वेळीं आपली ही पाहुणी इतकं कांहीं पाणचटपणाचं बोलणं बोलते, कीं तें ऐकून पुरुषही लाजेल. पण आपणांला संशय यायला काय कारण झालं?

कांति०:–अग, कारण हेंच, कीं एखादे वेळीं मर्यादेचा ती इतका कांहीं आव घालते, कीं तो एखाद्या साध्वी स्त्रीला शोभला, तरी साधायचा नाहीं.

लवं०:–मी तिच्याजवळ असलें म्हणजे कारण नसतांनाही ती माझ्या अंगाला अगदीं बिलगायला जाते. बायका बायका झाल्या, तरी कांहीं असं करीत नाहींत अगदीं एकमेकींत.

कांति०:–बरोबर. आणि कारण नसतांनाही ती माझ्यापासून अगदीं दूर पळून जाते. स्त्रीनं पुरुषापासून मर्यादेनं दूर राहायला झाली, तरी कांहीं मर्यादा आहेच कीं नाहीं?

लवं०:–ती पुरुष असती तर मीं तिला विषयलंपट म्हटलं असतं. माझ्याकडं कीं नाहीं ती अगदीं वाईट गहेऱ्या नजरेनं बघते.

कांति०:–आणि ती स्त्री असती तर मीं तिला कांगावखोर आणि पातिव्रत्याचा पोकळ नखरा करणारी म्हटलं असतं. माझ्या डोळ्याला ती डोळा म्हणून कशी ती देतच नाहीं. (दाढीवरून हात फिरवून) तूंच सांग बरं, मी तिचा आजोबा शोभेन कीं नाहीं? मला भिण्याचं तिला काय कारण?

लवं०:–(हंसून) तें असो म्हणा! पण एखादे वेळीं ती स्त्रियांनाच लाजून पदर सांवरते—

कांति०:–आणि एखादे वेळीं पुरुषांना पाहून ती लाजल्यासारखं करिते, पण पदर सांवरायचाच विसरते. मिळून काय? रामलीलेच्या ललितांत

स्त्रीचं सोंग घेतलेल्या तरुण मुलाप्रमाणं तिच्या चेष्टा फाजील तरी होतात, नाहीं तर बतावणीला अपुऱ्या तरी पडतात.

लवं०:—पण कसंही असलं तरी मला तर वाटतं, कीं ती स्त्री नव्हे खास.

कांति०:—शिवाय दुसरं एक तुझ्या लक्षांत आलं आहे काय?

लवं०:—काय तें?

कांति०:—या पाहुण्या बाईचा स्वभाव किती निष्काळजी आहे तो!

लवं०:—आपण त्या स्वभावाला निष्काळजी म्हणतां! पण मी तर त्याला चंचळ, खेळकर आणि रंगेल म्हणेन.

कांति०:—माझाही अर्थ तोच. पण मीं जरासा माझ्या स्वतःसारखा पोक्त शब्द घातला इतकंच.

लवं०:—बाबासाहेब तारिणीताईसाहेबांना रोज आग्रह करकरून सांगत असतात—

कांति०:—तें काय?

लवं०:—कीं तारिणी—बाळे, आपल्या घरीं आलेल्या या पाहुण्या बाईच्या मनाला करमणूक कर म्हणून. पण जिचा हंसण्याखेळण्याशिवाय एक क्षणही जात नाहीं तिची आणखी करमणूक ती काय करायची!

कांति०—होय, तुझा-माझा तर्क याही गोष्टींत जुळला. ही पोरगी एखादे वेळीं आपणाकडून दुःखाचा आव घालते खरी. पण काय? वरवर काळ्या दिसणाऱ्या ढगांच्या पोटांत वीज चमकली म्हणजे त्यांचा पोकळपणा दिसून येतो, तशीच आमच्या या पाहुण्या बाई तोंडावर ओढूनताणून उदासपणाची छटा आणतात खरी. पण तिनं नुसतं तोंड उघडण्याचा अवकाश! तिचं विलासी व आनंदी मन जिभेमुळं तेव्हांच उघडं पडतं. (पडद्याकडं पाहून) शुः शुः! पण ही पहा, तुझी ती माधवी इकडंच येत आहे. चल, आपण या झाडांच्या आड जाऊन लपून बसून ही काय काय चमत्कार करते तें पाहूं.

(दोघेंही किंचित् पडद्याआड जातात.) [हरनंद प्रवेश करतो.]

हर०:—आग लागो या माझ्या स्त्री-वेषाला. मी तर पुरा कंटाळलों याला! अष्टौप्रहर तोंडावर बुरखा घेऊन स्त्रिया कशा बसत असतील

देव जाणे! पण परकायाप्रवेश केल्याप्रमाणं मला आतां स्त्रियांचीं–निदान स्त्रियांच्या वेषाचीं सुखदुःखं चांगलींच कळूं लागलीं आहेत. हा वेष टाकून देण्याची वेळ येईल तो सुदिन. पण तोंपर्यंत आजच्या-सारखी जी काय एखादी एकांतवासाची संधि सांपडेल ती घेऊन जरा हातपाय मोकळे करावे, दुसरं काय? (हातपाय पसरून एकावर एक ताणून आळेपिळे देतो.) आतां या वेळीं मला कोणीही पाहात नाहीं. तेव्हां हा बुरखा जरा बाजूला सारायला काय हरकत?

**कांति०**:–लवंगे, पाहिलीस का? ही म्हणे स्त्री! एखाद्या स्त्रीचे केस कदाचित् आंखूड असतील. म्हणून बकऱ्याच्या केसासारखे डोकी-बरोबर कातरलेले का असतात?

**लवं०**:–आणि तिनं कुंकूं पहा कुठं लावलं आहे तें! गंधाच्या जागीं अगदीं गंधासारखं!

**हर०**:–स्त्रीवेषाची दीक्षा मला केवळ संकटानं दिली. असं असतां मीं त्या वेषाची बतावणी आजवर बरीच निभावून नेली म्हणायची! मग काय, स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या अंगविक्षेपांत इतका थोडाच फरक आहे कीं काय? कीं किंचित् बदल केला असतां एकाला दुसऱ्याचं रूप सहज येऊं शकतं? मानी स्त्रीची गजगति आणि वीरांची अवसानबद्ध चाल यांत बहुधा कांहींच अंतर नसावं! मिशांवर फिरण्याकरितां वळलेल्या बोटांना कोमल–कपोल–कंडूशमनाचा नाजूक चाळा फारसा कठीण जात नसेल. मोठा आवाज पुरुषांचाच असतो असं नाहीं; तो थोडा मुरडला आणि हेल काढले म्हणजे झाला स्त्रियांचा आवाज. फार तर जहांबाज बायको म्हणतील झालं! भिवयांची हालचाल स्त्री आणि पुरुष दोघांची सारखीच असते. तिरळा पुरुष आणि कटाक्ष फेकणारी स्त्री यांत काय अंतर? माधव या पुरुषवाचक नांवाचं फक्त एक उजवी वेलांटी देऊन जर माधवी असं स्त्रीवाचक नांव बनतं, तर पुरुषाच्या वेषांत नुसती एक उजव्या पदराची भर घातली, कीं स्त्री–वेष बनावा हें ठीकच आहे. बायकांचा पदर हा पुरुषांच्या वेषावर एक उजवी वेलांटीच आहे, नाहीं तर काय? ही वेलांटी घेऊन पहा फिरून बनलों मी पुरुषाची स्त्री.

कांति०:—लवंगे, या पुरुषाचं हें पुरुषाचं सोंग संपून तो फिरून स्त्री बनला. चल, आपण पुढं होऊन थोडी गंमत करूं त्याच्याशीं. मात्र मी बोलेन त्या धोरणानंच बोल जरा, म्हणजे होईल मौज.

( कांतिवर्मा आणि लवंगी पुढें येतात. हरनंद दचकून लाजल्यासारखं दाखवून पदर घेऊन उभा रहातो. )

हर०:—( बारीक स्वर काढून ) लवंगे, तुम्ही दोघं एकदम अवचित कुणीकडनं आलां ?

कांति०:—माधवीबाई, माझा आणि हिचा वाद चालला होता मोठा कडाक्याचा. तो इतका, कीं आपण तिला हांक मारीपर्यंत आपण इथं आहां हें आमच्या लक्षांतसुद्धां आलं नाहीं—

हर०:—पण देहभान जाण्यासारखा असा तुमचा वाद तरी कसला चालला होता, तें सांगाल कीं नाहीं ?

कांति०:—लवंगे, तूंच सांग.

लवं०:—तुम्हीच सांगा, मला नाहीं कांहीं सुचत !

कांति०:—अहाहा ! बोलली ! आठवत नाहीं म्हणायचं, तें सुचत नाहीं ग काय ? जसं काय मनचंच सांगायचं आहे. माधवीबाई, वाद आपला उगाच गंमतीचा होता. वेषांतर करण्याचा !

हर०:—काय, वेषांतर करण्याचा ? ( स्वगत ) मला या लबाडानं ओळखलं कीं काय ?

कांति०:—होय, वेषांतर करण्याचा ! ही लवंगी म्हणत होती, बायकांच्या मनांत आलं तर त्यांना पुरुषाचा वेष घेतां येणं सोपं आहे.

हर०:—आणि तूं काय म्हणत होतास ?

कांति०:—मी म्हणत होतों, कीं पुरुषांच्या मनांत जर बायकांचा वेष घ्यायचं आलं तर तें अधिक सोपं. माधवीबाई, तुमचं मत कुणासारखं आहे ? माझ्यासारखं कीं हिच्यासारखं ?

हर०:—पण आधीं हें सांग, कीं वेषांतर कशाकरितां करायचं ?

कांति०:—काय ग लवंगे, कशाकरितां ?

लवं०:—मला नाहीं सुचत.

कांति०:–फिरून तेंच! सुचत नाहीं काय? आठवत नाहीं म्हण! माधवीबाई, मी म्हणतों, वेषांतर आपलं उगीच गंमतीखातर का होईना! पण सांगा ना, अधिक सोपं कोणचं तें?

हर०:–(गोंधळून) मला वाटतं–स्त्रीनं पुरुषाचं सोंग घेणंच अधिक सोपं.

कांति०:–छे: छे:! आपण हें पक्षपातानं बोललां! हेंच एक घ्या ना? पुरुषाला स्त्री–वेष घ्यायचा झाला आणि त्याला मिशा असल्या तर त्या काढल्या म्हणजे झालं! आणि मिशा फुटलेल्याच नसल्या तर मग कायहो, बोलायलाच नको! सोन्याहून पिवळं. पण स्त्रियांना पुरुषाचं सोंग घ्यायचं झालं तर त्या मिशा कुठल्या आणणार?

हर०:–पण पुरुषाचं सोंग घ्यायला मिशाच कशाला हव्या? कारण मिशा उगीच कुठं आहेत आहेत, नाहींत नाहींत असे पुरुष काय थोडे असतात? बरं, मिशा दिसल्या म्हणजे तरी तो हटकून पुरुष ठरतो असंही नाहीं. मांजरीला मिशा असल्या म्हणून तिला बोका नाहीं म्हणत कुणी!

कांति०:–लवंगे, माधवीबाईनीं मला निरुत्तर करून टाकलं! तुम्ही दोघी बायका मिळालां, मग मला कसच्या बोलूं देतां! पण दुसरं. एकाद्या पुरुषाचं पांढरं धोतर तेंच, पण वेषांतर करायचं झालं आणि नुसता पदर काढला, कीं बनली बायको. नुसत्या एका बुरख्यानं वेषांतराचं सगळं काम होतं. होय कीं नाहीं माधवीबाई?

हर०:–(स्वगत) हें मी तरी नाहीं म्हणणार नाहीं!

कांति०:–पण लुगडं किंवा पैठणी नेसलेल्या बायकोनं ताबडतोब वेषांतर करायचं मनांत आणलं आणि तिनं डोक्यावरचा पदर खालीं टाकला आणि निऱ्या काढून सोगे सोडले तर कसं दिसेल? म्हणेल का कुणी तिला पुरुष?

हर०:–मी बुवा–नाहीं, मी बाई–निरुत्तर झालें यावर!

कांति०:–हा हा! हेंच पहा ना! आतां आपण बोलतां बोलतां बुवाची बाई कशी चटदिशीं झाली ती! हं! तसंच पुरुषाची स्त्री.

लवं०:–बोलतांना बुवाची बाई तोंडानं चटदिशीं होते. पण वेषांतरांत मात्र नाहीं हो तसं!

कांति०:–तोंडानं तर बुवाची बाई होती ना चटदिशीं? झालं तर, मी तच म्हणतों. तोंडापुरतं फसवायला आलं म्हणजे वेषांतराचं काम झालं.

पूर्वी पुराणांतरीं सांगतात ना? दशरथाला स्त्री–वेष देऊन परशरामापासून त्याचं रक्षण केलं! आणि अर्जुन तर काय, स्त्री–वेष घेऊन अंतःपुरांत खुशाल नांदत होता एक वर्षभर! कुणीं बायकांनीं म्हणून त्याला ओळखलं नाहीं. पुरुषांना स्त्री–वेष घेणं हें असं सोपं असतं, होय कीं नाहीं माधवीबाई? नाहींतर तूंच सांग बरं लवंगे, बायकांनीं पुरुषवेष घेऊन पुरुषांना फसविल्याचं एखादं तरी प्रसिद्ध उदाहरण!

**हर०**:–मला वाटतं यानं मला खास ओळखलं. आतां इथं याच्याशीं बोलत राहण्याची सोय नाहीं. (लवंगीस) लवंगे, चल बाई माझ्याबरोबर, मला इकडं येऊन किती वेळ झाला! तारिणीताईसाहेब माझी वाट पहात असतील.

**कांति०**:–(थट्टेच्या स्वरानं) जा हां! लवंगे माधवीबाईबरोबर! पण जरा जपूनच जा हां! नाहीं म्हटलं, संध्याकाळची वेळ आहे–मीही आलोंच तुझ्या मागोमाग. (हरनंद व लवंगी जातात.) ही बाई कसली? निःसंशय पुरुष आहे. हा आनंदभुवनांत कशाला घुसला वेषांतर करून? कशाला का असेना–आपल्याला कलागत लावायला मिळाली पुरे झालं! हा पहा, मी आतां चाललों चंद्रकांताकडं. तारिणी अलीकडं त्याच्याशीं पूर्वीप्रमाणं वागत नाहीं. तेव्हां वेषांतर करून राहिलेल्या या पुरुषाची हकीकत त्याच्या कानावर गेली म्हणजे चांगलीच कलागत लागेल, आणि पोटभर गंमत पहायला मिळेल! [चंद्रगुप्त प्रवेश करतो.]

**चंद्र०**:–कोण तो, कांतिवर्मा?

**कांति०**:–होय, मीच तो.

**चंद्र०**:–काय रे, तारिणी या बागेत आतां आली होती का?

**कांति०**:–होय, आतां इतक्यांतच त्या इथून गेल्या. मला वाटतं आपण त्यांना जातांना ओझरतं पाहिलंही असेल बहुधा!

**चंद्र०**:–होय, पाहिलंसं वाटतं खरं. पण ती एकटीच नव्हती. तिच्याबरोबर दुसरं कुणी तरी होतं असंही मला वाटतं.

**कांति०**:–होय, त्यांच्याबरोबर दुसरंही एक मनुष्य होतं.

**चंद्र०**:–तर मग बरोबर! दोघी असाव्या असं वाटलं खरं.

कांति०:—दोन माणसं होतीं. पण त्या दोघी स्त्रिया नव्हत्या इतकंच.

चंद्र०:—काय? दोघी स्त्रिया नव्हत्या? तर कोण?

कांति०:—एक स्त्री होती. आणि एक—(तोंड वाईट करून) काय सांगूं तुम्हांला!

चंद्र०:—कां, सांगायला अडखळतोस कां असा?

कांति०:—त्या दुसरीला स्त्री म्हणूं? का पुरुष म्हणूं? याचाच जरा विचार करतों आहें!

चंद्र०:—यांत विचार कसला?

कांति०:—विचार अशाकरितां कीं तिचा स्त्री—वेष होता खरा, पण तो वेष बनावट होता. निखालस पुरुषानं घेतलेला होता! तेव्हां म्हणूं तरी काय? स्त्री म्हणूं? का पुरुष म्हणूं?

चंद्र०:—काय? अशा वेषांतर केलेल्या पुरुषाच्या संगतींत तारिणी इथं आली होती म्हणतोस?

कांति०:—होय. पण इथं येण्यापुरतं वेषांतर केलं असं मीं कुठं म्हटलं? हा स्त्रीवेषधारी पुरुष आज बरेच दिवस आनंदभुवनांत—आनंदभुवनांतच काय पण तारिणीबाईसाहेबांच्या अगदीं जवळ रात्रंदिवस मी बघतों आहें. असेल त्यांचा कुणी लांबचा भाऊ!

चंद्र०—पण भावाला बहिणीजवळ राहायला स्त्री—वेषाचं काय कारण? शिवाय तारिणीला इतका जवळ बाळगण्यासारखा लांबचा भाऊ असल्याचं मीं केव्हांही ऐकलं नाहीं.

कांति०:—हो, तेंही खरंच!

चंद्र०:—काय? तीं दोघही आलीं होतीं इथं इतक्यांत?

कांति०:—होय, मी अवाचित आलों. नि पहातों तों तीं इथंच होतीं. मी आल्यावरही क्षणभर होतींच. पण आपण येतां असं दिसतांच मात्र बाईसाहेब आणि त्यांचा सोबती एकदम निघून गेले.

चंद्र०:—तूं त्या स्त्री—वेषधारी पुरुषाचा चेहरा पाहिला आहेस काय?

कांति०:—माझ्यापासून तो कशाला काळजीनं लपवील हो? माझी काय किंमत? पण चंद्रकांत, आपणही तो चेहरा पाहिला असावा!

आठवण करा. आपण परवां आनंदभुवनांत अवचित आलां, तेव्हां आम्ही सगळे होतों तिथं. त्यांतच हा ताईसाहेबांचा सोबतीही बुरखा घेऊन उभा होता. पण आपण आल्याबरोबर—

चंद्र०:—होय. मी आल्याबरोबर एक बुरखा घेतलेली स्त्री उठून आंत गेली असं मला वाटतं खरं. पण मी समजलों, कीं ती कुणी नवी दासीबिसी असेल!

कांति०:—काय दासी? (हंसून) हः! आतां ओघालाच आलं म्हणून आपला बोलतों. अहो, दासी कसली नि काय? या पाहुण्याच इतकं कांहीं प्रस्थ इथं माजलं आहे, कीं त्याच्या सेवेंत स्वतः घरधनीणच दासीसारखी राबते! सगळं कांहीं त्याला खुष करण्याकरितां, त्याच्या लहरीप्रमाणं चालतं.

चंद्र०:—(स्वगत) आतां लक्षांत आलं—तारिणी माझ्याशीं कां बोलत नाहीं आणि माझ्यावर रागावल्याचा बहाणा करिते ती! ठीक आहे. (विचार करून) असंच करावं! (उघड) काय रे कांतिवर्म्या, तूं एक माझं काम करशील का?

कांति०:—(स्वगत) आलं माझ्या लक्षांत काम कोणचं तें! (उघड) हो! हो! करीन म्हणजे काय? तुमचं काम मी कां नाहीं करणार? (स्वगत) कलागत लावायचं काम कुणीं सांगितल्याशिवाय मी होऊन करीत असतों. मग सांगितल्यावर तर काय बोलायलाच नको!

चंद्र०:—चल तर. (त्याचा हात धरून) मीं सांगतों असं तें काम हुबेहुब वठवून दे.

कांति०:—हो—सांगा—सांगा. [ दोघेही जातात. ]

## प्रवेश चवथा.

स्थळ—आनंदभुवनाजवळचा बगीचा.

[ स्त्री—वेषधारी हरनंद प्रवेश करतो. ]

हर०:—हा लज्जास्पद स्त्री—वेष घेऊन अज्ञातवासांत राहण्याचा प्रथम प्रथम मला मोठा वीट आला खरा. पण आतां तोच वेष मला

फार आवडूं लागला आहे. आणि हा अज्ञातवास जितका अधिक लांबेल तितका अधिक बरा असंही मला वाटतं. मी पुरुष वेषांत असतों तर तारिणीच्या इतक्या जवळ माझा प्रवेश कसा झाला असता? पण तेंच आतां पहा, तिचा हस्तस्पर्शही मला एखादे वेळीं चुकून होतो; आणि तिच्या सुगंधी उच्छ्वासाचा आस्वादही मला कित्येक वेळां घडला आहे! अहाहा! काय तें सुख! तरी मी आपला आपणाकडून जपून लांब लांब राहतों. फारशी लगट म्हणून करीत नाहीं. कारण न जाणों, अतिशय जवळ गेल्यानं चुकून एखादे वेळीं माझा तिला संशय आला तर फजिती व्हावयाची. माझं खरं स्वरूप तिला कळलं तरी तिच्याकडून म्हणजे मला कसली भीति आहे असं नाहीं. कारण या राजनिष्ठ कुटुंबाच्या सहवासांत येऊन पडल्यापासून, मी एखाद्या अभेद्य किल्ल्याच्या आंत केवळ वज्रमय कवचांत गुरफटून राहिलों आहे कीं काय, असा मला सुरक्षितपणा वाटतो. पण माझा कपटवेष प्रगट झाल्यानं तारिणीच्या सान्निध्यसुखाला मी अंतरेन इतकीच काय ती मला भीति वाटते! सुवर्णकेतकीच्या जाळींत सर्प दिवसभर वेटाळं घालून बसतो तो केतकीच्या बचावाकरतां नव्हे किंवा स्वतःच्या बचावाकरितांही नव्हे; तर त्या केतकीच्या सुगंधि आस्वादाला मोहून, हेंच खरं. मीं आज बागेंत फिरायला जाण्याची इच्छा प्रदर्शित केली ती तारिणीनं तेव्हांच मान्य केली. माझ्या सुखासमाधानाकरतां ती किती तरी जपत असते आपणाकडून! आणि मी जितका अधिक उदास आणि दुःखी दिसतों, तितका ती माझं मन रिझविण्याचा प्रयत्न अधिक करते. म्हणून लवंगीशीं वागतांना मी जरी हंसूनखेळून वागतों, तरी तारिणीशीं बोलतांचालतांना, मला उदासपणाच अधिक उपयोगीं पडतो. मीं स्वतः अबोला धरणं हें तारिणीला पुष्कळसं बोलायला लावायला एक बिनचूक साधनच सांपडलं आहे मला. आणि ती बोलूं लागली, कीं तिचं तें मंजूळ भाषण ऐकतां ऐकतां, मला स्वतःला बोलतां येतं हेंही मी विसरून जातों. तारिणीचं माझ्याशीं वर्तन अत्यंत ममतेचं आहे; पण त्या ममतेंत प्रेम किती आहे हें आज पाहण्याचा मीं निश्चय केला आहे. आणि तें कळायला मला दुःखीच बनलं पाहिजे. प्रेमाची मूर्ति विराजमान करून बसवायला दुःखभावनेची बैठक चांगलीच शोभते. पण ही तारिणीच आली.

[ तारिणी प्रवेश करते. ]

तारि०:–माधवीबाई, मला यायला उशीर नाहीं ना झाला फारसा ?

हर०:–( उदासपणानें ) उशीर झाला कीं नाहीं हें मला कळलंच नाहीं ! मी आपली इकडं आल्यापासून आभाळाकडं पहात बसलें होतें, तों इतक्यांत तुमची हांक ऐकली.

तारि०:–खरंच, तुमचं लक्ष आभाळाकडं इतकं वेधलं त्यांत कांहीं नवल नाहीं. हा पाहिलात का सूर्य अस्ताला चालला आहे ! त्याची शोभा या झाडांतून किती उत्तम दिसते ती !

हर०:–ताईसाहेब, अस्ताला जाणाऱ्या सूर्याची शोभा आपण कोणत्या अर्थानं म्हटलीत ?

तारि०:–हें काय ? त्या बिचाऱ्याला मी लावून कशाला बोलूं ? मी उपरोधिक बोलत नाहीं. खरंच, मावळत्या सूर्याचा हा देखावा सुंदर दिसत नाहीं काय ?

हर०:–मी तर म्हणतें कीं हा देखावा फारच भेसूर, भयंकर दिसतो.

तारि०:–विकास पावलेलं हें सूर्यबिंब तुम्हांला गोड वाटत नाहीं काय ?

हर०:–( सुस्कारा टाकून ) दिवासुद्धां मालवतांना असाच मोठा होतो. विकास होणं हें कांहीं ऐश्वर्याचं सुचिन्ह असंच कांहीं म्हणतां येत नाहीं. छेः छेः ! मला तर हें सूर्यबिंब पाहून भयच वाटतं. शिरच्छेद केल्यामुळं आपल्याच रक्तानं माखलेल्या एखाद्या राजपुत्राच्या मुंडक्यासारखं तें मला भासतं.

तारि०:–बरं, तें सूर्यबिंब राहिलं. पण हा संध्याप्रकाश पश्चिम दिशेला कसा काय शोभतो ?

हर०:–अगदीं एखाद्या रणभूमीवरच्या रक्ताच्या सड्याप्रमाणं ?

तारि०:–पण हीं नक्षत्रं पाहिलींत का कशीं ठिकठिकाणीं उगवून लखलखताहेत तीं !

हर०:–होय. ताईसाहेब मला वाटतं, कीं हाडांचं पीठ करून त्यानं घातलेली आकाशांगणांतली ती उदंड रांगोळीच जशी कांहीं !

तारि०:–किती ही शांत वेळ !

हर०:—दिवसभर आकाशांत स्वच्छंदानं विहार केलेल्या पशुपक्षिगणांवर रात्रीनं प्राणसंकट आणलं; तेव्हां हे बिचारे भयानं जागा सांपडेल तिथं दडूनलपून माना खालीं घालून बसले. म्हणून शांतता अवतरली आहे खरी! स्मशानांतसुद्धां सर्व काळ शांतताच नांदत असते. पण ताईसाहेब, या अशा शांततेंत सुख किंवा समाधान का आहे?

तारि०:—पण सर्व प्राणिमात्रावर अमृतवर्षाव करणारी निद्रा त्यांना सूर्यास्तामुळंच मिळते ना?

हर०:—त्यांना निद्रा सूर्यास्तानंतर मिळते खरी. पण त्यामुळं सूर्य हा जर त्यांच्या निद्रेचा वैरी म्हणावा तर तो मावळतांना ते मौन कां धरतात? आणि दुःखविलाप कां करतात? पण तेच, सूर्य उगवतांना आनंदानं किलबिल करून नाचू-बागडू कां लागतात? प्राणिमात्रांचं सुखदुःख लोकांनीं आपल्या मनावरून ठरविण्यापेक्षां प्राणिमात्रांच्या कृतीवरूनच ठरवावं हें बरं, नाहीं काय?

तारि०:—(स्वगत) कोणत्याच देखाव्यानं यांना समाधान वाटत नाहीं, काय करावं? (उघड) खरं म्हणतां माधवीबाई तुम्ही! दुःख आणि सुख हें सहसा ज्याच्या त्याच्या मनोभावनेप्रमाणंच असत. पण पूर्वेकडं हें चंद्रबिंब उगवलं आहे नुकतंच, तें पाहिलंत का? मला वाटतं, कीं वाटेल त्या मनःस्थितींतल्या मनुष्याचं मन रमण्याकरताच परमेश्वरानं चंद्र हा उत्पन्न केला असावा. चंद्रबिंब पाहून आनंद होणार नाहीं असा एक तरी जीव मिळेल काय?

हर०:—ताईसाहेब, हा आपणाला भ्रम आहे. चंद्र उगवलेला पाहून सुख होतं कीं दुःख होतं तें त्या पलीकडच्या तळ्यांतल्या कमलिनींना विचारा. त्या सांगतील त्याचं उत्तर आपणाला. पण मी, हो चुकलें. त्यांचं तोंड दुःखावेगानं मिटलेलं, त्या तुमच्याशीं आपलं मनोगत कसं बोलणार?

तारि०:—त्या आपलं मनोगत बोलल्या नाहींत तरी मला तें कळणार का नाहीं! त्यांचंच कशाला? पण माधवीबाई, तुमचंही बोलणं स्पष्ट नसलं तरी तुमच्या मनांत कोणते विचार घोळत आहेत, हें मला नाहीं का कळत?

हर०:–( स्वगत ) माझ्या मनांत घोळणारे विचार इनं ओळखले असं ही म्हणते, यांत तिचा हेतु काय असावा बरं? ( उघड ) काय म्हणतां ताईसाहेब? माझ्या मनांतले विचार तुम्हीं ओळखले? सांगा! सांगा पाहूं माझ्या मनांतले विचार! ते तुमच्या तोंडून ऐकायला मिळाले तर त्या गोड प्रतिध्वनीनं मनाला किती तरी समाधान होईल!

तारि०:–सांगूंच का? नंदराजघराण्याच्या संहाराचं दुःख तुमच्या मनांतून अजून जात नाहीं! आणि म्हणूनच शुभदर्शन असे देखावे पाहून तुम्हांला अशुभ गोष्टींची आठवण होते.

हर०:–( सुस्कारा टाकून ) होय ताईसाहेब. पण तें दुःख आठवून तरी काय उपयोग? किती झालं तरी मी पडलें स्त्री, माझ्या हातून रडण्यापेक्षां अधिक तें काय होणार? त्या दुष्ट चाणक्याचा आणि चंद्रगुप्ताचा सूड उगविणं माझ्या हातून कसं होणार? सूड घेण्याचं सुख पुरुषांनाच लाभतं!

तारि०:–खरंच माधवीबाई, ईश्वरानं तुम्हांला स्त्री न करतां पुरुषच केलं असतं तर फार चांगलं झालं असतं.

हर०:–( उत्सुकतेनें ) तें कसं बरं ताईसाहेब?

तारि०:–म्हणजे नंद महाराजांच्या बाजूनं लढणाऱ्या शूर वीरांच्या संख्येंत आणखी एकाची भर पडली असती. आणि सुदैवानं वांचलेल्या कुमार हरनंदाच्या बचावाला आणखी एक सहाय्यकर्ता मिळाला असता!

हर०:–अहाहा, ताईसाहेब! तुमच्या भाषणांत खरोखरच कांहीं जादू असली पाहिजे. कारण मला स्त्री न करितां पुरुष केलं असतं तर बरं झालं असतं, ही तुमची इच्छा ईश्वरानं खरोखरच मान्य केली असावी असं मला वाटतं!

तारि०:–या जगांत मनुष्याच्या सर्व इच्छा तोंडांतून शब्द निघाल्याबरोबर जर अशा सफळ होऊं लागल्या, तर मग भूलोक आणि स्वर्ग यांत अंतर तें काय राहिलं? कल्पवृक्षाचं बीज पृथ्वीवर रुजल्याचं आजवर मीं कधीं ऐकलं नाहीं!

हर०:–आजवर ऐकलं नसेल. पण प्रत्यक्षच पहायला सांपडलं तर मग काय म्हणाल? ताईसाहेब, तें पाहिलंत का तिकडं कोण आहे तें?

( तारिणी वळून पाहते तोंच हरनंद झटकन् स्त्री-वेष टाकून देऊन पुरुष-वेष घेतो. )

तारि०:–( दुसरीकडे पहात ) तिकडे कुणीच नाहीं. इथं तुम्ही आणि मी दोघच आहों.

हर०:–होय. तारिणी, तुझ्यामाझ्यामध्यें तिसरं कधींच कोणी येऊं नये अशी माझी ईश्वराला प्रार्थना आहे!

तारि०:–( परत वळून आश्चर्यानें ) काय ? हें काय मी पहातें आहें ?

हर०:–तारिणी, तुझ्याच इच्छेप्रमाणं ईश्वरानं मला स्त्रीचा पुरुष केला. खरोखरच कल्पवृक्षाचं बीज पृथ्वीवर आज उगवलं. सुंदरी! खचित हा तुझ्या प्रेमाचाच प्रभाव!

तारि०:–( दूर होऊन ) खचित या ठिकाणीं कांहीं तरी कपट असलं पाहिजे. बोला, बोला, माधवीबाई कुणीकडं गेल्या ? आणि तुम्ही कोण ? या ठिकाणीं अवचित कुठून आलां ?

हर०:–तारिणी, रागानं असा चित्तक्षोभ होऊं देऊं नकोस. माझ्याकडं नीट बघ. माझ्याकडं डोळे भरून पहा. म्हणजे ज्याप्रमाणं तुझा संशय फिटेल त्याप्रमाणं मलाही धन्यता वाटेल.

तारि०:–छेः छेः! मला कांहींच कल्पना करवत नाहीं.

हर०:–तारिणी, तुला कल्पना होत नसली तर मी सांगतों. ज्याला तूं आजवर 'माधवी' अशा गोड नांवानं हांक मारीत होतीस तोच मी. स्त्री-वेषाचं लांछन मला कांहीं कारणानं लागलं होतं खरं. पण तो वेष मला अलीकडं फार दुःसह झाला होता. तुझ्या सहवाससुखामुळंच मीं तो सोसला. शेवटीं तो टाकून देण्याची सूचना तुझ्या तोंडून मला आली. हे तुझे माझ्यावर केवढे तरी उपकार आहेत!

तारि०:–( भिऊन ) अगबाई, खचित आपण कांहीं तरी कपटाचा लपंडाव खेळतां आहां माझ्याशीं!

हर०:–होय, आजवर कपटाचा लपंडाव खेळलों खरा. पण त्याची क्षमा कर. तो लपंडाव आजपासून मात्र संपला! आणि मीं हा जो माझा पुरुषवेष फिरून धारण केला, तो झाला तरी हा लपंडाव संपावा

म्हणून ! तारिणी, प्रेमाचा उदय ज्या हृदयांत झाला, त्यांत त्यापुढं कपटाला थारा कसा मिळणार ? यापुढं माझे तुझ्याविषयींचे मनोभाव मी गुप्त ठेवीन तर मात्र निःसंशय तें कपट होईल. म्हणून मला ते बोलून दाखविण्याची परवानगी दे.

**तारि०**:–( त्रासून ) बोला ! बोला ! काय असेल तें लवकर बोला. माझ्या मनाची फारच चमत्कारिक स्थिति झाली आहे.

**हर०**:–तारिणी, माझा वेष बदललेला पाहून तुझ्या मनाची स्थिति या घटकेला चमत्कारिक झाली असेल. पण सुंदरी, मी स्त्रीवेषानं माधवाबरोबर या आनंदभुवनांत तुझ्याजवळ येऊन राहिल्यापासून, आज इतके दिवस माझ्या मनाची स्थिति किती चमत्कारिक झाली असेल याचा तूंच विचार कर. लोहचुंबकाशेजारीं राहून आपलं आकर्षण झालं नाहीं, असं दाखविणं ही गोष्ट लोहाला किती परिश्रमाची असेल बरं ! तारिणी, तुझा मुखचंद्र नित्य जवळ असतां माझ्या हृदयसमुद्राला आलेली भरती मला आंतल्या आंत दाबून ठेवावी लागली, त्यामुळं मला किती कष्ट पडले असतील याची तुला कल्पना तरी आहे काय ?

**तारि०**:–असलं हें तुमचं अलंकारिक भाषण मला समजत नाहीं आणि आवडतही नाहीं. बोला, तुम्ही कोण ? आणि तुमचा खरा वेष तरी कोणता ? स्त्रीचा, कीं पुरुषाचा ?

**हर०**:–तारिणी, तुला यांपैकीं माझा जो वेष आवडेल तोच माझा खरा वेष. मीं फिरून पुरुषवेष घेतला आहे खरा. पण माझा स्त्री-वेषच तुला पसंत असेल तर मी तोही घेण्याला तयार आहें.

**तारि०**:– दुष्टा, तुझ्या निर्लज्जपणाची आतां मात्र सीमा झाली. पुरुषासारखा पुरुष होऊन स्त्री-वेष धारण करण्यांत तुला भूषण वाटतं ! धिक्कार तुझ्या चारित्र्याला ! पण तूं आपलं चारित्र्य मातींत लोळवायला तयार झालास म्हणून तूं माझा अपमान केलास तो मुळींच कमी होणार नाहीं ! ( त्वेषानें ) अरेरे ! माझा माधवदादा या ठिकाणीं नाहीं. नाहींतर तुझ्या अपराधाचं इथल्या इथं योग्य प्रायश्चित्त मीं दिलं असतं.

**हर०**:– तारिणी, हा तुला भ्रम आहे. माधवानंच मला आपल्याबरोबर आणून तुझ्या स्वाधीन केलं हें तूं विसरलीस वाटतं !

तारि०:—मग काय, तुम्हीं त्याच्यावरही आपलं कपटजाल पसरलंत कीं काय?

हर०:—नाहीं. मीं त्याच्यावर कपटजाल पसरलं नाहीं. इतकंच नव्हे तर त्याच्याच आग्रहावरून हा स्त्री-वेष मीं घेतला. पण जाऊं दे. तारिणी, तुला मी भ्रमांत कशाला ठेवूं? मी कोण, आणि हा स्त्री–वेष धारण करण्याचं कारण मला कां पडलं हें तुला एका शब्दांत सांगतों. म्हणजे तुला माझं हें कपट वाटणार नाहीं! ऐक, तारिणी! तुझ्यापुढं उभा आहे तो नंदवंशापैकीं सुदैवानं वांचलेला एकटा एक राजपुत्र. मीच हरनंद!

[ आपली नाममुद्रा दाखवितो. ]

तारि०:–( आश्चर्यानें ) काय महाराज, आपणच हरनंद? अहाहा! आनंदभुवन आज धन्य झालं! जाऊं दे, बाबांना ही बातमी जाऊन सांगूं देच!

हर०:–( तिला अडवून ) पण तारिणी, मला तूं आपला असं म्हणून धन्य केल्याशिवाय मी तुला जाऊं देणार नाहीं. [ तिचा हात धरतो. ] तारिणी, माझ्या प्रेमाचा तूं अव्हेर करूं नको. त्याचा तुला पश्चात्ताप होईल. राजे लोक प्रजाजनांजवळ याचना करीत नाहींत. पण हा याचना करण्याचा कधींही कुणाला न मिळणारा मान आज तुला मी उदार मनानं देतों. तो स्वीकारण्यांत तुला भूषणच आहे!

तारि०:–( रागानें ) अरेरे! राजभक्तीच्या भरांत मी माझा अपमान विसरून गेलें होतें. त्याची आठवण, महाराज, आपणच करून दिलीत. नंदवंशांतल्या राजपुत्राला असलं आचरण शोभत नाहीं!

हर०:–मी तुझ्यावर प्रेम करतों यांत वावगं तें काय करतों? मी क्षत्रिय कुळांतला राजपुत्र झालों म्हणून कुलीन, सद्गुणी, उपवर सुंदरीवर प्रेम करण्याचा माझा हक्क कसा नाहींसा होतो? राजा या नात्यानं प्रजाजनांचं करग्रहण करणं हें माझं कर्तव्यच आहे. तुझा राजा आणि तुझा वल्लभ या दोन्ही नात्यानं मी—

तारि०:—पण प्रजेपासून कर घेण्याबद्दल राजांनीं प्रजेचं अन्यायापासून रक्षण करणं हेंही त्यांचं कर्तव्य आहे, नव्हे काय?

हर०:—अलबत! तारिणी, बोल! तुला कोण अन्यायानं त्रास देत आहे? त्याचं मी आतां पारिपत्य करितों.

तारि०:—महाराज, आपणच. दुसरा कोण?

हर०:—तें कसं सांग पाहूं?

तारि०:—महाराज, माझं मन—माझं प्रेम—माझ्या स्वाधीन राहिलेलं नाहीं. त्याचं आधींच दान होऊन चुकलं आहे. म्हणून आपण अभिलाष-बुद्धीनं माझ्या अंगाला स्पर्श करून अनेकांचा अनेक परीनं अपराध करीत आहां!

हर०:—काय? तुझ्या प्रेमाचं दान आधींच होऊन चुकलं आहे? हं! समजलों. पण तारिणी, तुझी चूक मी दुरुस्त करून देतों. कारण, राजाला दुरुस्त करितां येत नाहीं, अशी चूकच कोणती नसते. ईश्वराच्या खालोखाल सर्वशक्तिमत्व असेल तर तें राजालाच!

तारि०:—राजेलोकांनीं सर्वशक्तिमत्तेवर वाटेल तर हक्क सांगावा. तो योग्य कीं अयोग्य हें मला अज्ञान बायकोमाणसाला काय सांगतां येणार? पण मला एक गोष्ट कळते. ती ही, कीं स्त्रीच्या प्रेमावर मात्र राजाचीही सत्ता नाहीं खास. स्वच्छंदानं क्रीडा करणारा वारा, सृष्टिनियमा-प्रमाणं वाढणाऱ्या व फलपुष्प धारण करणाऱ्या वृक्ष-वेली, उताराकडं वळणानं वाहणारा जलप्रवाह, यांच्यावर राजाचाही हुकूम चालूं शकत नाहीं. तीच गोष्ट स्त्रीच्या प्रेमाची.

हर०:—राजेलोक हे ईश्वराचाच अंश आहेत हें तूं विसरलीस वाटतं? ईश्वराची जशी पंचमहाभूतांवर सत्ता चालते, तशीच राजांची प्रजाजनांच्या प्रेमावर चाललीच पाहिजे. तशी न चालली तर मग ते राजे कसले?

तारि०:—पण आजपर्यंत कोणाही चांगल्या राजांनीं अशी सत्ता गाजविल्याचं मीं ऐकलं नाहीं. आणि ज्या अधम राजांनीं ती गाजविण्याचा प्रयत्न केला त्यांच्या राज्यमंदिरावर ईश्वरी कोपाचा विद्युत्पात झाल्याशिवाय राहिला नाहीं हें मात्र मीं ऐकलं आहे. चला, दूर व्हा.

हर०:—तूं वेडी आहेस. ईश्वरानं पृथ्वीवरच्या कारभाराचं सर्व काम राजेलोकांकडं सोपविलेलं असतं. आपल्या प्रतिनिधींच्या कामांत तो अशी ढवळाढवळ कशाला करील?

[ तिचा हात धरण्याचा प्रयत्न करतो, इतक्यांत बळिराम प्रवेश करतो. ]

बळि०:—(रागानें) हे कामांध राजपुत्रा! ईश्वर राजेलोकांच्या कारभारांत ढवळाढवळ करतो कीं नाहीं, याची प्रचीति तुला अजून आली नाहीं काय? खचित तुझे ज्ञानचक्षुच काय, पण चर्मचक्षुही फुटले असले पाहिजेत! एरवीं तुझ्या स्थितीचा तुला विसर पडला नसता! हरनंदा, तुझा बाप आणि त्याचं सर्व कूळ एका क्षणांत नष्ट झालं! ऐश्वर्यपर्वताच्या शिखरावरून अधःपात होऊन दुःख-समुद्राच्या तळाला जाऊन मिळालं! तें काय ईश्वरी कोपाशिवाय? राजेलोकांच्या कारभारांत ईश्वरानं ढवळा-ढवळ करण्याची आणखी ती काय उरली? असं असतां अजून तूं शुद्धीवर येत नाहींस! तेंव्हां धिक्कार असो तुला. तुझ्या वाडवडिलांचे दुर्गुण तुझ्या अंगीं चांगलेच उतरले आहेत! त्यांच्याचबरोबर तुझाही संहार व्हायचा, पण केवळ ईश्वराच्या कृपेमुळं तूं वांचलास आणि या थोर मनुष्यांच्या आश्रयाला आलास. पण अजून तुझी पापवासना जात नाहीं. तस्मात् धिक्कार असो तुला!

हर०:—अरे हा कोण?

तारि०:—बळिदादा! [ त्याजवळ जाते. ]

बळि०:—तारिणी, भर राजसभेंत चाणक्याच्या आज्ञेवरून राजा चंद्रगुप्त हरनंदाला मारण्याची प्रतिज्ञा करीत होता, त्याला मीं आपणाकडून प्रतिबंध केला. पण हरनंदाचे हे पापविषयक चाळे पाहून असं वाटतं, कीं चंद्रगुप्ताला मीं व्यर्थ प्रतिबंध केला. पण अजूनही कांहीं बिघडलं नाहीं. चंद्रगुप्त इकडंच यायला निघालेला आहे, असं मला समजलं आहे. ईश्वराची इच्छाच असेल तर राजधानींत जें संहाराचं काम थांबलं तें अजून इथंही पुरं होईल.

तारि०:—नको, नको. बळिदादा, असं बोलूं नको! मला तें ऐकवत नाहीं. महाराज, झालं तें झालं. तें आपण विसरा. मीही विसरून जातें. चला, आपलं रक्षण करण्याच्या पवित्र कर्तव्याची मला फिरून आठवण झाली. आपण आतां आनंदभुवनांतच जाऊं या. आपणाला इथं कुणी एखादा ओळखील कदाचित!

हर०:–तारिणी, माझ्या डोळ्यांत अंजन घालण्यालाच ईश्वरनं या ब्रह्मचारीबुवाला इथं पाठविला असावा. तारिणी, याच क्षणापासून माझी दृष्टि निवळली. चल, आपण आनंदभुवनाकडे जाऊं. [ सर्व जातात. ]

## प्रवेश पांचवा.

स्थळ—आनंदभुवनाशेजारचें अरण्य.

[ चंद्रगुप्त प्रवेश करतो. ]

चंद्र०:–त्या स्त्री-वेषधारी नंदपक्षपाती पाहुण्या सरदाराला काल मी तिथल्या तिथंच कंठस्नान घालणार होतों. पण आनंदभुवनांत गोंधळ माजेल, आणि तारिणीच्या मनाला दुःख होईल म्हणून मी मन आवरून मागं परतलों. मात्र कांतिवर्म्याच्या हातून त्याला अपमानास्पद असा निरोप पाठविला. पण कपटी व विलासासक्त झालेल्या तरुणाला कसली मानापमानाची चाड! काय करावं? हा तरुण सरदार निरोपाप्रमाणं युद्धाला जर न आला तर निराशेनं आणि रागानं मला वेड लागल्याशिवाय खचित रहाणार नाहीं. ( अंग थरारून ) या पहा, माझ्या अंगांतून आवेशाच्या कशा लहरीवर लहरी येत आहेत! त्यांचा उपशम जर योग्य रीतीनं न झाला तर मी आनंदभुवनांत जाऊन काय अनर्थ करीन व काय न करीन हें माझं मलाच सांगतां येत नाहीं. अहाहा! काय हा रम्य व शांत प्रभातसमय! अशा वेळीं मी युद्धाची कटकट माजवून सृष्टि-देवतेचा उपमर्द करतों आहें खरा. पण माझ्या प्रेमाची अशी विटंबना झाली तर मीं ती मुकाट्यानं कशी सहन करूं? मी राज्यलक्ष्मीहून जिच्या-वर अधिक प्रेम करतों त्या माझ्या तारिणीचा हा असा अपमान पाहून, मी मनुष्यासारखा मनुष्य कसा स्तब्ध बसूं हें सृष्टिदेवते, तूंच सांग! ( हरनंद प्रवेश करतो. ) अरे, पण हा तरुण सरदार आलाच. शाबास, याला अपमानाची चीड आहे तर एकूण!

हर०:–कोण, चंद्रकांत?

चंद्र०:–होय तोच मी! तुझीच वाट पहात बसलों होतों. ( त्याला नखशिखांत न्याहाळून ) पण काय रे? तुझा स्त्री-वेष कुठं गेला? आणि

त्याच्या जागीं हा पुरुष-वेष कसा आला? तुझ्या या गोंडस हातांत कांकणं बरीं शोभत होतीं. त्यांना तरवार धरण्याचे हे श्रम कशाला? स्त्री जशी दयेला आणि अनुकंपेला पात्र असते तसाच स्त्री-वेषधारी पुरुषही असतो. पुरुषजातीवर सर्वत्र अखंड विजय मिळविण्याचं साधनच असा तुझा बायकी पेहराव तूं कां टाकलास? त्याची तुला इतक्यांतच लज्जा कशी वाटली? त्याच वेषांत तूं माझ्यासमोर येऊन क्षमा मागतास तर तुला ती सहज मिळाली असती!

**हर०**:—तुझ्या प्रश्नाचं उत्तर तुझ्या प्रश्नांतच आहे. मग मला फिरून कां विचारतोस? तुझ्या हातून मला क्षमाच पाहिजे असती तर तुझ्या उपदेशाचा अव्हेर मीं केला नसता. पण मला क्षमा नको आहे. अपमानास्पद असा निरोप पाठविणाऱ्या उन्मत्त तरुणाची जीभ मला छाटून टाकायची आहे. म्हणूनच मी तो वेष टाकून माझ्या स्वाभाविक वेषांत या ठिकाणीं आलों आहें, समजलास? तुला आपल्या शौर्याची आणि युद्धकलेची घमेंडी झालेली दिसते. ती जिरविण्याला हा पहा मी तयार आहें! चल, काढ आपली तरवार!

**चंद्र०**:—माझ्या तरवारीला म्यानाबाहेर निघण्याला कधीं कोणाचं निमंत्रण लागत नाहीं. ही पहा! मी कधींही वेषांतर करीत नसल्यानं अरण्यांतल्या वाघिणीप्रमाणं किंवा नागिणीप्रमाणं, आपलं भक्ष्य टेहळण्याला माझ्याबरोबर नेहमीं तयार असते. (तरवार काढतो) पण तुला पाहून मला फिरून असं वाटतं, कीं तुझ्यावर क्षमा करावी, आणि तूं धारण केलेला स्त्री-वेष तुझी वाट पहात असेल त्याकडं तुला परत पाठवावं!

**हर०**:—त्या वेषाची तुला आतां काळजी नको! दुर्दैवानं त्याचा मला स्पर्श झाला होता खरा. पण तो टाकून देण्याला मी चांगलंसं निमित्त पहात होतों तें तूं आयतंच दिलंस. स्त्री-वेष-धारणाचं लांछन धुऊन टाकायला तुझ्या अंगांतून काढलेलं रक्त मला चांगलं उपयोगीं पडेल!

**चंद्र०**:—जा रे! केवढ्याही संकटांत का होईना, स्त्री-वेष घेण्याची ज्याला बुद्धि झाली त्याचं खरं शौर्य दिसतंच आहे. माझं रक्त सांडण्याची हाव तुझ्यासारख्या भ्याड मनुष्यानं धरून स्वतःला हास्यास्पद कां करून

घ्यावं? पण स्त्री-वेष घेण्यासारखं निर्लज्जपणाचं कृत्य ज्यानं केलं त्याला स्वतःला हास्यास्पद करून घेण्यासारखं बाकी तरी काय उरलं आहे! पण कायरे, तुझं नांव तरी काय? तुझे बायकी चाळे मीं डोळ्यांनीं पाहिलेच. पण तुझं नांव ठेवतांना तुझ्या आईबापांना तुझ्या गुणाची कल्पना काय होती? स्त्रियांसारखं नटणं हें तुझ्या आईबापांना कितपत प्रिय असेल हें तरी कळून येईल त्यावरून!

हर०:—तुला माझ्या नांवाशीं काय कर्तव्य आहे? मी जर तुझं नांव विचारीत नाहीं तर तूं तरी माझं नांव कां विचारावंस? आपल्या नांवाचं भांडण थोडंच आहे! या घटकेला या ठिकाणीं आपले देह लढणार. नांवं कांहीं लढणार नाहींत!

चंद्र०:—तुझं नांव समजलं म्हणजे नंदपक्षाच्या कोणत्या कपटी पुरुषाला मीं कंठस्नान घातलं हें कळून मला समाधान तरी वाटेल.

हर०:—मी कपटी असों कीं कसाही असों. मी नंदपक्षपाती आहें येवढं कारण, तुझ्या अंगांत यत्किंचित्‌ही राग असेल तर तो प्रदीप्त होण्याला पुरेसं आहे. मी नंदपक्षपाती आहें, आणि म्हणूनच नंदांचं वैर करणाऱ्या चंद्रगुप्ताच्या एका सरदाराला आज लोळवायला सांपडल्यानं मला विशेष आनंद वाटतो.

चंद्र०:—पण केवळ तूं नंदपक्षपाती आहेस येवढी गोष्ट माझ्या कानावर घालून मला राग आणायचा तुझा प्रयत्न व्यर्थ आहे. अरे, खुद्द नऊ नंद, त्यांचे सरदार आणि सैनिक याच तरवारीनं रणांगणावर मीं इतके लोळविले आहेत, कीं तुझ्यासारखं आणखी एक क्षुद्र पोर मारून माझ्या यशोमंदिरावर कोणचा कळस मी चढविणार?

हर०:—मग तूं मला अपमानास्पद निरोप पाठवून युद्धाला तरी कां पाचारण केलंस? कसाही निरोप पाठविला, तरी हा युद्धाला येणार नाहीं व आपलं युद्ध टळेल असं तुला वाटलं असेल तर ती कल्पना व्यर्थ आहे. विजयसंपादन इतकं सोपं असतं तर जगांत आज सर्व क्षत्रियच झाले असते.

चंद्र०:—माझे वाक्शर कितीही तीक्ष्ण असले तरी स्त्री-वेषाच्या अभेद्य कवचांतून ते तुला लागणार नाहींत अशी भीति उलट मला वाटत होती

खरी. पण काय रे, थोडे दिवस का होईना ? अंगाशीं चिकटून राहिलेला स्त्री-वेष टाकून देतांना तुला वाईट वाटलं असेल, नाहीं ?

हर०:–( रागावून ) माझ्या स्त्री-वेषाची गोष्ट फिरून फिरून काढून मला खिजविण्याची तुझी आशा व्यर्थ आहे. त्या वेषाचं काम संपलं ! त्याला मीं आतां कायमची रजा दिली आहे ! ( हंसून ) शिवाय ज्या वेषामुळं तारिणी-सारख्या स्त्रीचा निकट सहवास मला घडला तो वेष मला सदा प्रियच रहाणार ! बोल, आतां तरी तुला राग येतो का ? आतां तरी तुला युद्ध करावंसं वाटतं का ? ( तरवार सरसावतो ) मीही तुझी परीक्षाच पहातों.

चंद्र०:–परीक्षा पहावयाला कशाला हवी ? तारिणीशीं कपट केल्याबद्दल तुला प्रायश्चित्त देण्याकरितां मीं होऊन जर तुला बोलावलं तर मी युद्धाला माघारा का फिरेन ? चल, हा पहा मी वार करतों, संभाळ.

हर०:–( चंद्रगुप्ताचा वार तरवारीनें परतवून ) हा पहा, मीं तुझा वार परतविला. माझ्या स्त्री-वेषाची आतां फिरून तुला आठवण होणार नाहीं. माझ्या तरवारीचा खणखणाट कानांत भरल्यामुळं माझ्या हातांतल्या लांछनास्पद कांकणांचा आवाज तुझ्या कानांतून कायमचा निघून जाईल.

चंद्र०:–ठीक आहे. तुला तुझ्या स्त्री-वेषाची आठवण दुःसह होत असली तर मीही ती यापुढं करणार नाहीं. तुझा हात थोडासा तरवार खेळलेला दिसतो. यामुळं तुझ्याबद्दल मला मनांत वाटणारा तिटकारा नाहींसा होईल. पण तारिणीचा अपराध तूं केलेला मला कधींही विसरतां येणार नाहीं. उलट, त्या आठवणीमुळंच हा पहा माझ्या तरवारीला फिरून दुप्पट आवेश येत आहे तुझ्या शरीरांत शिरायला.

हर०:–काय तारिणीचा अपराध ? ही निवळ बदनामी आहे. तारिणीवर जितकं तुझं तितकंच माझंही प्रेम होतं–आहे. अविवाहित तरुणीवर उघडपणें प्रेम करण्याला कोणाही तरुणाला अधिकार आहे. त्याप्रमाणं मीं तिच्यावर प्रेम केलं.

चंद्र०:–पण स्त्री-वेष धारण करून कपटानं एखाद्या तरुण स्त्रीच्या सहवासांत राहण्याचा कोणाही तरुणाला खचित अधिकार नाहीं. पण हा तोंडी वादविवाद आतां काय म्हणून ? चल, सावध रहा. हा पहा मी

फिरून तुझ्यावर वार करितों! (ते लढूं लागतात, इतक्यांत तारिणी धांवत येते, आणि हरनंद व चद्रगुप्त यांच्यामध्यें जाऊन उभी रहाते.)

तारि०:—हाय, हाय, मी किती हतभागी ही! माझ्यामुळं असा हा अनर्थ ओढवणार असं मला कळतं तर मीं अनर्थाचं मूळच काढून टाकलं असतं. चंद्रकांत थांबा, थांबा, तुम्ही तरवार आवरा. (हरनंदाकडे पाहून) सरदारसाहेब, तुम्हीही माझ्यावर दया करून हात आवरता घ्या. आणि तसं तुम्हां दोघांनाही करायचं नसेल तर त्याच तरवारी माझ्या शरीरावर चालवा.

चंद्र०:—तारिणी, तूं या वेळीं इकडं कशी आलीस?

हर०:—ताईसाहेब, मी इकडं आलों याची खबर आपणांला कुणीं दिली?

तारि०:—चंद्रकांत, सरदारसाहेब, आपण दोघेही मला प्रिय आहां हें आपणाला माहीत असतांना, माझ्या मनाला दुःख आणि नांवाला लांछन आणण्यासारखं हें युद्ध तुम्हीं कसं आरंभिलं?

चंद्र०:—(स्वगत) काय, तर मग तारिणीचं याच्यावरही प्रेम आहे? (उघड) तारिणी, आम्ही दोघेही तुला प्रिय आहों असं मला माझ्या तोंडावर सांगितल्यानं माझा हा क्रोधाग्नि शांत होईल असं तुला वाटलं? माझ्या प्रेमाची हीच तूं परीक्षा केलीस काय? (आवेशानें) तें कांहीं नाहीं. अरे ए नंदपक्षपाती नांव चोरणाऱ्या तरुण सरदारा, चल. तारिणीची मध्यस्थी या कामीं मला साफ ऐकायची नाहीं. तुझा-माझा हा तंटा फक्त युद्धानंच संपणार!

हर०:—ठीक आहे! या उदार स्त्रीच्या पाठीशीं पडून मला आपला जीव बचावावयाचा असता तर तिला न कळत, किंबहुना तिला चुकवून, मी या ठिकाणीं तुझ्याशीं लढण्याला आलोंच नसतों. द्वेषाग्नींत तापवून वर प्रेमाचं पाणी दिलेली तरवार किती तीक्ष्ण असते ती पहा.

[ते लढूं लागतात, तों तारिणी फिरून त्यांच्यामध्यें येते.]

चंद्र०:—तारिणी, तूं माझा असा दुष्टपणाचा छळ कां करितेस? तुझ्या प्रेमावर माझी सत्ता नाहीं हें मी कबूल करितों. पण मी आणि माझा वैरी यांच्या कलहांत पडून माझ्या क्षात्रधर्माच्या आड तूं यावंस हें ठीक नाहीं. मी तुला एकवार बजावतों. तूं व्यर्थ आपली शोभा करून घेऊं नकोस.

तारि०:–चंद्रकांत ! तुम्ही मला काय वाटेल तें म्हणा किंवा मला मनांत वाटेल तशीं नांवंही ठेवा. पण ( हरनंदाकडे बोट दाखवून ) यांच्या केसालाही तुम्हांला मी धक्का लावूं देणार नाहीं. माझ्या शरीराचे तुकडे प्रथम होतील, मग यांच्या शरीराला धक्का.

चंद्र०:–( रागानें ) तारिणी ! धिक्कार असो मला ! असले शब्द ऐकण्याला मी जिवंत तरी कशाला राहिलों ? माझ्या मोठेपणाविषयीं नवीन कल्पना मनांत येऊन माझे डोळे फांकले होते. त्यांना तारिणी ! तूं चांगलंच अंजन घातलंस. अरेरे ! आपल्या बापाच्या शपथेचं मिष करण्याच्या साध्या, सोप्या युक्तीनं तूं मला दूर ठेविलंस, आणि या स्त्री-वेषधारी तरुण पुरुषाला अष्टौप्रहर जवळ बाळगून त्याला आपलं प्रेम मनसोक्त लुटूं दिलंस ! अहाहा ! कोण हा तुझा अलौकिक आज्ञाधारकपणा ! तूं आपल्या पित्याचा माथा फार चांगला उजळ केलास यांत शंका नाहीं. दुष्टे, दुराचारिणी ! माझं प्रेम तुला कस्पटासमान वाटेल, तर तें एक असो. मी तरुण आहें, क्षात्रधर्मी आहें. मला वाटेल तर माझ्या अपमानाचा सूड घेतां येईल. अथवा जन्मापासून माझ्या कपाळीं ज्याप्रमाणं वनवास व अज्ञातवास लिहिलेला होता तसाच, हातीं ऐश्वर्य असतांही त्याचा त्याग करून फिरून मी वनवास आणि अज्ञातवास पत्करीन, आणि, तारिणी, तुझ्यावर केलेल्या एकनिष्ठ व निःसीम प्रेमाच्या अपराधाचं प्रायश्चित्त जन्मभर भोगीन. पण चांडाळणी ! तुझा पिता वृद्ध व जवळ जवळ अंध बनलेला, अशा स्थितींत आपला प्रियकर स्त्री–वेषानं अंतःपुरांत दडवून ठेवलास; या तुझ्या शीलाला आणि चारित्र्याला त्रिभुवनांत तरी जोड कशी मिळणार ? ठीक आहे. अशी ही कुलांगार स्त्री आणि स्त्रीच्या पाठीस दडून जीव बचावणारा क्षत्रिय अशा या अलौकिक जोडीच्या सहवासानं भ्रष्ट झालेल्या या आनंदभुवनांत यापुढं एक क्षणभर देखील पाऊल ठेवणं म्हणजे माझा हा पवित्र देह कायमचा विटाळण्यासारखं आहे. [ जाऊं लागतो. ]

तारि०:–( रडत ) चंद्रकांत ! थांबा, थांबा. जाऊं नका. ( त्याच्या शेल्याचा पदर धरते. ) तुमचं मन भयंकर संशयानं ग्रासून गेलं आहे. पण मी तरी काय करूं ? तुमच्या संशयाचं निराकरण मला एका शब्दांत

करतां आलं असतं, पण तो शब्द मला प्राणापलीकडं जतन करून ठेविला पाहिजे. तुम्हांला आनंदभुवन कायमचं सोडून जायचं असेल, तर, तुमच्या समजुतीप्रमाणं, तुमच्या प्रेमाची मीं विटंबना केली आहे तिचं प्रायश्चित्त मला द्या. तुमचा सूड माझ्यावर उगवा. आणि बाबांच्या कीर्तीला काजळ फांसणाऱ्या या चांडाळणीला जगांतून आपल्या हातानं नाहींशी करून जा. एवढी कृपा माझ्यावर कराच.

हर०:–( स्वगत ) अरेरे! मी केवढ्या अनर्थाला कारणीभूत झालों! या राजनिष्ठ बापलेकींच्या भक्तीचं फळ मी त्यांचा राजा त्यांना असंच देणार काय? या कृतघ्नपणाबद्दल मला द्यायला ईश्वराच्या घरीं प्रायश्चित्त तरी कोणतं मिळणार? नंदकुळावर ईश्वराचा एवढा क्षोभ झाला, हें पाहून तरी मला सुबुद्धि सुचायला नको होती काय? बस्स. तें कांहीं नाहीं. 'मी कोण? मला तारिणी इतका कां जपते?' हें तिला आपल्या तोंडानं सांगतां येत नाहीं. यामुळं परस्परांवर खरं प्रेम करणाऱ्या या उभयतांच्या प्रेमांत जन्माची माती कालविण्याचा प्रसंग आलेला उघड दिसतो. यांच्या प्रेमाची हत्या करून मी कोणत्या नरकांत जाऊं? ( उघड ) चंद्रकांता! थांब, थांब. परत फीर. या निर्मळ स्त्रीविषयीं तूं भलताच संशय घेऊं नको. या सर्व संशयाचं मूळ कारण मी आहें. तूं परत फीर, मी एका शब्दानं तुझी याच पावलीं खात्री करून देतों.

चंद्र०:–( परत फिरून ) काय? माझा संशय व्यर्थ आहे? आणि त्याचं निराकरण तूं एका शब्दानं करणार?

हर०:–होय. पहा त्याची प्रचीति. माझा एकच शब्द, पण त्याचं महत्त्वही तसंच आहे. चंद्रकांता! तूं जो आपल्यापुढं उभा राहिलेला पहातोस तो कोणी यःकश्चित् पुरुष नव्हे. नंदकुळाच्या संहारांतून दैवयोगानं वांचलेला एकटा एक राजपुत्र तो मी. माझंच नांव हरनंद! स्त्रीवेषाचं लांछन मला लागलं होतं खरं. पण केवळ माझ्या राजनिष्ठ अनुयायाच्या आग्रहाकरितां मला तें पत्करावं लागलं. पण त्या माझ्या स्त्री-वेषामुळं तारिणीसारख्या निर्मळ स्त्रीला जें लांछन विनाकारण लागूं पहात आहे त्याच्यापुढं माझं स्वतःचं लांछन कांहींच नाहीं असं मी समजतों. चंद्रकांता! तारिणीविषयीं तुझ्या मनांत आलेला संशय व्यर्थ आहे. मी

प्रगट झाल्यानं माझंच काय व्हायचं असेल तें होईल. पण तारिणीची यापुढं कुचंबणा होऊं देणं हें मला योग्य नाहीं. अर्जुनाचा बृहन्नटावेष आणि अज्ञातवास हीं जशीं एकदमच संपलीं तशींच माझींही. ( पाय आपटून ) यापुढं हा हरनंद नंदवंशाचा वारस म्हणून उजळ माथ्यानंच वावरणार. हा पहा; मगध देशाचा राजा मी ! राजनिष्ठ तारिणीचा प्रेमळ भाऊ व पाठिराखा मी !! आणि नंदकुळाचा संहार करणाऱ्या चंद्रगुप्ताचा हाडवैरीही मीच !!!

**तारि०**:–( रडत ) महाराज, तुम्हीं हें काय केलंत ? माझ्या नांवाला लागणारा काळिमा मीं सोसला असता. चंद्रकांतांच्या संशयाच्या आगींत मी होरपळून गेलें असतें, तरी मला त्याचं इतकं दुःख वाटलं नसतं. पण महाराज, नंदकुळाचा संहार करण्याच्या प्रतिज्ञेनं पेटलेल्या चंद्रगुप्ताच्या क्रोधाच्या आगीचं भय मला अधिक वाटतं !

**चंद्र०**:–( आश्चर्यानें ) काय ? हा हरनंद ? आणि त्याची माझी या ठिकाणीं अशी गांठ पडावी ? याला मी सुदैव म्हणूं, कीं दुर्दैव म्हणूं ?

**तारि०**:–( चंद्रगुप्ताच्या समोर उभी राहून ) चंद्रकांत ! तुमच्याशीं मला थोडं कपट करावं लागलं याची मला क्षमा करा. जो भयंकर संशय तुमच्या मनांत आला होता, त्याचं निराकरण माझी इच्छा नसतांच परस्पर झालं. पण तुमचं मन माझ्याविषयीं शुद्ध होवो किंवा न होवो; या घटकेला तुमच्या प्रेमापेक्षांही मला राजपुत्राचे प्राण अधिक आहेत. चंद्रगुप्ताला सहाय्य करून तुम्हीं मित्रकार्य केलंत, तसंच राजपुत्राचे प्राण वांचविणं हेंही माझं आणि माझ्या बाबांचं मित्रकार्यच आहे. म्हणून तुम्हांला मी हात जोडून प्रार्थना करितें, कीं नंदवंशाचा शेवटचा राजपुत्र जिवंत राहील, त्याच्या केसालाही धक्का लागणार नाहीं असं मला वचन द्या.

**चंद्र०**:–तारिणी, असं हें भलतंच वचन तूं कसं मागतेस ? नंद माझे शत्रु आहेत–म्हणजे महाराज चंद्रगुप्ताचे शत्रु आहेत.

**तारि०**:–पण शत्रूवर दया करणं हें खऱ्या क्षत्रियाला शोभण्यासारखंच आहे.

हर०:—तारिणी, हें तूं काय बोलतेस? माझ्यावर दया करण्याची माझ्या शत्रूला विनंति करून तूं माझ्यावर उपकार करीत नसून अपकार करीत आहेस, हें तूं विसरतेस वाटतं?

तारि०:—महाराज! आपणांवर मी उपकारही करीत नाहीं, किंवा अपकारही करीत नाहीं. नंद व चंद्रगुप्त हे समरांगणांत लढत होते, ते धर्मयुद्ध करीत होते, तोंपर्यंत अशी प्रार्थना मीं केली नसती. पण सर्व नंदवंशाचा संहार होऊन एकटा एक राजपुत्र निराश्रित, असहाय्य असा सांपडला असतां, त्याचाही प्राण घेऊं पाहणं हा अन्याय आहे. म्हणून, चंद्रकांत, तुमच्याजवळ मी न्याय मागतें.

चंद्र०:—पण तारिणी, मी चंद्रगुप्ताचा मित्र असलों तरी सैनिक आहें; त्याची आज्ञा मला पाळलीच पाहिजे. त्याचं मनोगत मला सफळ केलंच पाहिजे. [ बळिराम घाईघाईनें प्रवेश करतो. ]

बळि०:—चंद्रकांत, तारिणी, तुम्ही इथं अरण्याची शोभा काय पहात बसलां आहां? ही काय करमणूक करीत बसण्याची वेळ? चला, आनंदभुवनांत चला. राजधानीहून आर्य चाणक्य आणि चंद्रगुप्त स्वतः सैन्य बरोबर घेऊन आनंदभुवनाकडं आल्याची बातमी आली आहे. त्यांच्या आघाडीचे सैनिक आनंदभुवनापासून एक कोसावर आहेत. राजपुत्र इथं असल्याची बातमी खचित त्यांना कुणीं तरी दिली असावी.

चंद्र०:—काय, आर्य चाणक्य? आणि चद्रगुप्तसुद्धां? छेः! यांत कांहीं तरी चूक असली पाहिजे. चंद्रगुप्त चाणक्याबरोबर खास येत नाहीं.

बळि०:—बरोबर येत नसेल तर कदाचित् पुढंही आला असेल! पण चंद्रगुप्त येवो न येवो, चाणक्य येतो आहे ना? झालं तर. राजपुत्राचा बचाव आपल्याला करायचा असेल, तर एव्हांच त्याच्या उद्योगाला लागलं पाहिजे.

तारि०:—(चंद्रगुप्ताचे पाय धरून) चंद्रकांत, कशी खडतर वेळ आली ही? आर्य चाणक्य इथं आला म्हणजे राजपुत्राच्या जिवाला धोका येणार. आणि आमच्या पाहुण्याच्या जिवाला अपाय झाला तर बाबा तत्काल प्राण सोडतील. आणि जी वाट बाबांची तीच मग माधवदादाची आणि माझी. राजपुत्राचं आणि तुमचं तर वैर नाहीं ना?

तुमचा आणि चंद्रगुप्ताचा जर स्नेह आहे, तर बाबांची इच्छा सफळ करण्यापुरती भीड त्याला तुम्हांला घालतां येईल. आनंदभुवन जप्त झालं होतं, तें सोडविण्याचा हुकूम पूर्वी तुम्हीं आमच्या प्रेमाखातर जसा चंद्रगुप्ताकडून आणला तसा राजपुत्राच्या संबंधानंही तुम्हांला आणतां येईल.

चंद्र०:–तारिणी, आनंदभुवन जप्त करण्याची प्रतिज्ञा चंद्रगुप्तानं केली नव्हती, पण राजपुत्र हरनंद याचा शिरच्छेद करण्याची प्रतिज्ञा तो करून चुकला आहे.

तारि०:–तें कसंही असो. माझ्या प्रेमाखातर मी मागतें ती भिक्षा मला घाला. नाहीं तर मी तुमचे पाय सोडणार नाहीं.

चंद्र०:–( स्वगत ) काय करूं ? प्रेम कीं प्रतिज्ञा ? प्रतिज्ञा कीं प्रेम ?

तारि०:–काय ? चंद्रकांत, प्रेमाखातर मला एवढी भिक्षाही तुम्ही घालीत नाहीं ? ठीक आहे. ( जंबिया काढून ) पुढं होणारा निःपात आज करून टाकण्याची जर माझ्या स्वतःच्या हातांत शक्ति आहे तर मीं दीनवाणी होऊन भिक्षा कां मागावी ? [ जंबिया मारून घ्यायला उचलते. ]

हर०:–( पुढें होऊन ) हां हां तारिणी, असं साहस करूं नको. अशी प्रेमळ भगिनी गमावल्यावर मी तरी जिवंत कशाला राहूं ?

चंद्र०:–( पुढें होऊन ) तारिणी ! आवर. हात आवर.

[ तिचा हात धरतो. ]

तारि०:–चंद्रकांत, खबरदार माझ्या अंगाला स्पर्श कराल तर !

चंद्र०:–तूं काय वाटेल तें म्हण. मी तुझा हात सोडणार नाहीं. तुझी भिक्षा मीं घातली. तुझी विनंति मीं मान्य केली. तुझी आज्ञा मला शिरसा वंद्य आहे. ऊठ. माझी शपथ ऐक. माझ्या शरीरांत प्राण आहेत तोंपर्यंत हरनंदाच्या प्राणाला धक्का लागणार नाहीं. झालं आतां तरी ?

[ दोघें हातांत हात घालून उभीं राहतात. ]

हर०:–( तारिणीस ) ताई, तुझा प्रियकर आणि तूं दीर्घायुषी होऊन निरंतर सौख्य भोगा. [ माधव प्रवेश करतो. ]

माध०:–अरे ! तारिणीला मीं द्यायचा तोच आशीर्वाद माझ्याच शब्दांनीं देणारा हा नवा भाऊ तारिणीला कोण मिळाला ?

६

बळि०:—ये ये माधवा, तूंच तेवढा कमी होतास. तुझ्या राजनिष्ठामूलक कपटानं आज या ठिकाणीं केवढा अनर्थ ओढवणार होता!

माध०:—( चोहोंकडे पाहून ) तारिणी, हें काय? ( हरनंदाकडे पाहून ) महाराज! आपण आपला गुप्त वेष टाकण्याचं धाडस कां केलं? ( चंद्रगुप्ताकडे पाहून ) चंद्रकांता, तूं केव्हां आलास? आणि या तरवारी म्यानाबाहेर काय म्हणून? इथं शत्रु तर कुणीच दिसत नाहीं!

चंद्र०:—होय. माधवा, एका क्षणापूर्वी हें तुझं वर्णन खोटं ठरलं असतं, आणि या नागव्या तरवारींचा अर्थही तुला कळला असता! पण तें आतां संपलं. तारिणीच्या प्रेमानं या युद्धभूमीची स्नेहभूमि झाली! हरनंदा ये, तुला मला प्रेमानं भेटूं दे.

बळि०:—हीं तरुण माणसं म्हणजे मोठीं अविचारी. जिकडं वाहवतील तिकडे वाहवतील! इतका वेळ मारूं कीं मरूं असं चाललं होतं. आतां उराशीं धरूं कीं डोक्यावर धरूं असं चाललं आहे. पण आर्य चाणक्य सैन्य घेऊन येतो, याची शुद्ध आहे का कुणाला?

माध० व तारि०:—( एकदम ) चला, चला.

[ सर्व जातात. पडदा पडतो. ]

## अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—आनंदभुवनाजवळील बाग.

[ चंदनदास व बळिराम बोलत बसले आहेत. ]

**चंद०:**—बळि, जसजसा वृद्धापकाळ वाढत जातो तसतशा लहानपणच्या आठवणी आठवूं लागाव्या हा काय बरं चमत्कार ?

**बळि०:**—यांत चमत्कार कसला ? अरे, आयुष्य हें एक रंगण आहे आणि आत्मा हा त्या रंगणावर फिरणारा घोडा आहे. यां मंडळाची त्याची प्रदक्षिणा जसजशी संपत जाते तसतसा मनुष्य पूर्वस्थळाजवळ येत जातो. आणि म्हणूनच अगदीं लहानपणीं पाहिलेल्या ओळखीच्या खुणा त्याला फिरून दिसूं लागतात. मृत्यूमुळं पुढला जन्म येण्याच्या वेळीं आत्म्याला आदल्या जन्माच्या द्वारींच आपण उभे आहों कीं काय असं वाटत असावं. पण चंदनदासा, तुला लहानपणच्या अशा गोष्टी तरी कोणत्या आठवतात सांग पाहूं !

**चंद०:**—काल रात्रीं मला स्वप्न पडलं, कीं लहानपणच्यासारखे आपले गुरु योगीराजमहाराज यांच्या घरीं तूं, मी आणि विष्णुगुप्त असे खेळत होतों आणि पुढें आपण काय काय करणार याच्या गोष्टी बोलत होतों.

**बळि०:**—तूं, मी आणि विष्णुगुप्त ? बरं. त्या गोष्टी बोलतांना तूं काय म्हणत होतास ?

**चंद०:**—मी म्हणत होतों, कीं मी संसार चांगला थाटून संसारसुख भोगीन.

**बळि०:**—आणि तसं तूं आजवर भोगलंसही. बरं, मी काय म्हणत होतों ?

**चंद०:**—तूं म्हणत होतास कीं स्वतःचा संसार न थाटतां, ब्रह्मचर्यव्रतानं जन्मभर राहून, जगांतील इतर मनुष्यांचं सुख तेंच आपलं सुख असं मानून, मी आपला जन्म सुखांत घालवीन. आणि तसा तूं घालविलास खरा !

बलि०:–आणि विष्णुगुप्त रे काय म्हणत होता ?

चंद्र०:–तो म्हणत होता, कीं मीही जन्मभर ब्रह्मचारीच राहीन, पण जगाशीं फारसा संबंध ठेवणार नाहीं. आणि ठेवलाच तर माझ्या संबंधापासून जगाला सुख म्हणून फारसं होणार नाहीं. कारण अन्याय आणि अपमान या गोष्टींचा मला मनापासून राग असल्यामुळं मी कोणाशींही झालं तरी कडकपणानंच वागेन. आणि हें आमचं भाषण ऐकून गुरुमहाराज मोठ्यानं हंसले; आणि म्हणाले ' पहा, ही सत्त्व-रज-तम या त्रिगुणांची त्रयी. हा विष्णुगुप्त तामसी आहे, पण जगांत आपलं नांव करील. '

बलि०:–खरंच. गुरुजींच्या या भाषणाची मलाही आतां चांगलीच आठवण झाली. गुरुजींनीं म्हटल्याप्रमाणं माझं आणि तुझं भविष्य तर खरं ठरलंच. पण विष्णुगुप्ताचा जन्म कसा, कुठं गेला याची मात्र आपणांला कांहीं माहिती नाहीं. आपण मरण्यापूर्वीं त्याची व आपणां उभयतांची गांठ पडली तर तो एक ईश्वरी चमत्कारच मी तरी मानीन.

चंद्र०:–मीं असं ऐकलं आहे, कीं चंद्रगुप्ताला आपला शिष्य करून त्याच्या हातून ही राज्यक्रांति घडवून आणणारी व्यक्ति हा कोणी एक ब्रह्मचारीच आहे. आणि त्याचं वर्णन जेव्हां मीं ऐकलं, तेव्हां अकस्मात् विष्णुगुप्ताची मूर्ति माझ्या मनांत उभी राहिली ! खरोखर विष्णुगुप्ताची गांठ जर इतक्या वर्षांनीं पडली तर मीही तो ईश्वरी चमत्कारच मानीन.

बलि०:–( हंसून ) पण मला वाटतं त्याची आणि तुझी गांठ न पडलेलीच बरी !

चंद्र०:–तें कां ?

बलि०:–कारण त्याची आणि तुझी गांठ पडली आणि तो चंद्रगुप्ताचा गुरु आणि नंदांचा शत्रु ठरला तर तुम्हां दोघां म्हाताऱ्यांची तिथंच झुंज लागून तरुण माणसांना ती एक गंमतच पाहायला आणि हंसायला होइल.

चंद्र०:–मला कोणी हंसलं तरी चालेल, पण खरंच विष्णुगुप्ताची गांठ पडावी अशी उत्सुकता मात्र मनाला लागली आहे. काय कारण असेल कांहीं कळत नाहीं. [ माधव व हरनंद प्रवेश करितात. ]

माध०:—बाबा, मी तुम्हांला एक आनंदाची बातमी सांगायला आलों आहें.

चंद०:—बाळा माधवा, काय ? मला आनंद होईल अशी बातमी ?

माध०:—होय, बाबा तशीच आहे.

चंद०:—काय ? कुमार हरनंद जिवंत आहे ही ती बातमी असेल काय ?

माध०:—होय बाबा, कुमार जिवंत आहेत एवढंच नाहीं, तर हे पहा ते आपल्याच भेटीला या ठिकाणीं आले आहेत. [ हरनंद येतो. ]

हर०:—बाबासाहेब, हा पहा आपल्या उदार राजभक्तीमुळं धन्यता पावलेला हरनंद.

चंद०:—कोण ? कुमार हरनंद ? अहाहा ! केवढं हें माझं भाग्य ! हें आनंदभुवन आज पवित्र झालं. कारण नंदराजपुत्राचे चरण त्याला लागले. ( न्याहाळून पाहून ) काय ! महाराज आजच आनंदभुवनाला आले ? मला वाटतं कुमारांनीं यापूर्वी मला केव्हां तरी दर्शन दिलं असावं.

हर०:—बाबासाहेब, नंदवंशाला हल्लीं आलेल्या दशेला अनुरूप असा वेष मी पूर्वी घेऊन आलों होतों. आपण जिला मुलीप्रमाणं प्रेमानं वागविली ती माधवी माझ्याशिवाय दुसरी तिसरी कोणी नव्हती.

चंद०:—( आश्चर्यानें ) काय ? माधवी ?

माध०:—बाबा, या कामीं आपणांशीं मीं थोडंसं कपटाचरण केलं याची क्षमा व्हावी. त्या दुष्ट चंद्रगुप्ताचे दूत सर्वत्र संचार करीत असल्यामुळं पुरुष-वेषांत कुमारांचं संरक्षण होणं कठीण होतं. याकरितां त्यांना स्त्री-वेष देऊन आनंदभुवनांत मीं ठेवलं होतं. पण ही गोष्टही उघडकीस आली; आणि चाणक्य-चंद्रगुप्ताचं सैन्य इकडं येत आहे म्हणून संरक्षणाकरितां कुमारांना दूर देशीं पाठविण्याची व्यवस्था मला करावी लागत आहे. कुमार आपला शेवटचा निरोप घेण्याकरितां भेटीला आले आहेत. [ लवंगी घाबऱ्या घाबऱ्या येते. ]

लवं०:—धांवा हो धांवा ! ते पहा राजाचे सैनिकलोक आनंदभुवनापलीकडच्या आंबराईत येऊन उतरत आहेत. आणि आपल्या गुरांमाणसांना त्रास देत आहेत.

माध०:—काय ? इतके जवळ शत्रूचे लोक आले ?

बळि०:—थांबा. मी जाऊन पाहून येतों काय प्रकार आहे तो.

हर०:—येऊं देत. माधवा, तूं कांहीं काळजी करूं नको. पुष्पपूरच्या लढाईत जें नंदवंशाचं यश नष्ट झालं तें आज मीं बलात्कारानं फिरून हस्तगत करणार. माझ्या क्षत्रिय कुळाच्या तोंडाला काळिमा आणण्यासारखा वेष ज्याच्यामुळं माझ्या अंगाला लागला त्या शत्रूची खोड मोडण्याचा प्रसंग आज आला तर त्यांत मला आनंदच आहे.

माध०:—छेः छेः महाराज, ती गोष्टसुद्धां आपण बोलूं नका. आपल्या प्राणावर आपली सत्ता नाहीं, आम्हां राजभक्त प्रजाजनांचीच आहे. मी सांगतों त्याप्रमाणं आपण ऐकलंच पाहिजे. आपणाला माझ्या गळ्याची शपथ आहे. आपणाला या ब्रह्मपुत्रा नदींतून समुद्रापर्यंत पोंचविण्याची व्यवस्था करून मी आलों आहें. आपण नदीपर्यंत पोंचलां म्हणजे मग कशाचीच भीति नाहीं. तर चला, आतां विलंब करतां कामा नये. बाबा, कुमारांना एकवार आशीर्वाद द्या म्हणजे ते निघालेच.

चंद०:—माधवा, तुझी योजना मला मान्य आहे. आतां, कधीं नव्हे ते कुमार आज माझ्या घरीं आले, त्यांना चार दिवस ठेवून घ्यावे, त्यांचा सत्कार करावा, नंदमहाराजांच्या उपकाराचं आणि स्नेहाचं थोडं तरी ऋण फेडावं असं मला राहून राहून वाटतं; पण तें सुख माझ्या नशिबीं नाहीं. असो. कुमार, मला तुम्हांला एकवार कडकडून भेटूं द्या. तुम्ही आज माझे राजे तर आहांच, पण बंधुसमान असणाऱ्या नंदमहाराजांचे पुत्र म्हणून मला पुतण्यासारखेही आहां.

हर०:—काका, आतां मी कसला राजा ? राज्य-विषयक कल्पनांना आतां माझ्या भग्न मनोरथाशिवाय दुसरं कोणतं स्थान मिळणार ? मलाही राजा व प्रजा यांपेक्षां आप्तपणाचं नातंच अधिक प्रिय आहे. हा पहा मीं आपल्या पायावर मस्तक ठेवतों. मला फक्त आपला आशीर्वाद असावा. [ चंदनदास त्यास वर उचलून घेऊन आलिंगन देतो. ]

माध०:—( घाईनें ) बाबासाहेब, आतां उशीर करूं नका. कुमारांना जाण्याला अनुज्ञा द्याच.

चंद०:—ठीक आहे. जा. कुमार, ईश्वर तुमचं संरक्षण करो. ( वर आकाशाकडे पाहून व हात जोडून ) ईश्वरा, नंदमहाराजांचे आम्ही शेंकडों प्रजाजन आहों, त्यांच्या आयुष्यांतला थोडथोडा भाग घेऊन त्याच्या योगानं कुमार हरनंदाचं आयुष्य तुला वाढवितां येणार नाहीं का ? हा पहा, मी आपलं उरलेलं सर्व आयुष्य कुमाराकरितां तुला वाहण्याला तयार आहें. पण मी काय, मरणाच्या दारीं टेकलेला. माझं आयुष्य कितीसं उरलेलं असणार, असं तुला वाटेल तर मी आपल्या पोटच्या अपत्यांच्या आयुष्यांतला भाग तुला अर्पण करण्याला तयार आहें. एवढी विनंति मान्य कर.

हर०:—बाबा, नंदमहाराज, ऐका. पृथ्वीवर तुम्हीं आपल्या प्रेमानं बद्ध करून ठेवलेल्या या प्रजाजनांचे हे उद्‌गार स्वर्गातून ऐका, म्हणजे खचित तुम्हांला धन्यता वाटेल !

चंद०:—जा, माधवा. कुमारांना सुरक्षित पोंचवून ये. ( हरनंद व माधव जाऊं लागतात. ) पण थांब. माधवा, मला एका गोष्टीची आठवण झाली. जाऊं नको. अद्यापि एक गोष्ट करावयाची आहे.

माध०:—ती काय बाबा ?

चंद०:—ऐक. (पेटी काढून) ही पहा, ही पेटी मीं नित्य उराशीं बाळगून ठेवली आहे. ती मला कुमाराच्या स्वाधीन करावयाची आहे.

हर०:—बाबासाहेब, मी ज्या स्थितींत बाहेर पडणार त्या स्थितींत माझ्याजवळ जडजोखीम नसेल तितकं बरं, असं नाहीं का वाटत आपणाला ? जीव घेऊन पळतांना मनुष्याला मौल्यवान् वस्तु जवळ बाळगल्यापासून उपकारापेक्षां अपकारच अधिक होईल.

माध०:—कुमार म्हणतात तेंच बरोबर आहे.

चंद०:—पण या पेटींत काय आहे तें तुम्हांला कळलं म्हणजे तुम्ही असं म्हणणार नाहीं. कुमार ऐका, माधवा ऐक. ही पेटी युद्ध सुरू होण्यापूर्वी एकच दिवस नंदमहाराजांनीं माझ्याकडं आपल्या विश्वासू दूताच्या हातीं पाठविली, आणि त्याच्याचबरोबर एक पत्रही पाठविलं.

माध०:—पत्रांत काय लिहिलं होतं बरं ?

चंद्र०:—पत्रांतले उद्गार फारच दुःखद होते. ते तुम्हांला पुढं मागं पेटींतल्या पत्रावरूनच कळतील. आतां माझ्यानं ते उच्चारवत नाहींत. मी तुम्हांला सांगतों इतकंच पुरे. दुःख, राग आणि पश्चात्ताप इतक्या विकारांनीं व्यग्र झालेल्या मनानं, भावी मृत्यु डोळ्यापुढं दिसूं लागला असतां, नंदमहाराजांनीं आपलं हृद्गत सांठवून ठेवलेली ही पेटी, कुमार, घ्या आणि ईश्वरकृपेनं तुम्ही जगलां वाचलां तर आपल्या वडिलांची इच्छा पूर्ण करा. घ्या ही पेटी. [ पेटी देतो. ]

माध०:—कुमार, बाबांची विनंति आपण मान्य करावी. पेटी लहानच आहे. आपणाला ती वाटेल त्या रीतीनं संभाळतां येईल. ( हरनंद व माधव जाऊं लागतात. इतक्यांत बळिराम प्रवेश करितो. )

बळि०:—थांब माधवा, चाललास कुठं ?

माध०:—कुमाराला पोंचवायला ! आतां अधिक बोलायला क्षणाचाही वेळ नाहीं. शत्रुसैन्य अगदीं जवळ आलं असेल.

बळि०:—होय. आणि म्हणूनच मीही झालं तरी म्हणतों, कीं थांब, चाललास कुठं ?

माध०:—कुमाराला पोंचवायला.

बळि०:—वेडा आहेस. कुमाराला पोंचवायला तूं जाऊन काय करणार ? तें काम तारिणी करील. ( हातांत नागवी तरवार घेतलेली व प्रवासाचा वेष घेतलेली तारिणी प्रवेश करिते. ) तिला मी हेंच सांगून घेऊन आलों आहें. शत्रुसैन्य आनंदभुवनाच्या दाराशीं येऊन ठेपलं आहे. त्याचा समाचार घ्यायला तूंच इथं राहा. आपणाला आनंदभुवन थोडं-बहुत तरी किल्ल्यासारखं लढविलंच पाहिजे. आनंदभुवन लढविण्यांत आपण जितका वेळ घालवूं, तितका कुमाराला नदीतीरापर्यंत पोंचायला अधिक वेळ मिळेल. शिवाय, आनंदभुवनांत कुमार आहे असा जर शत्रुसैन्याचा समज झाला तर तें एका अर्थानं बरंच.

माध०:—( आनंदानें ) होय, बळिदादा, तूं फार चांगली युक्ति काढलीस. पण तारिणीच्या हातून कुमाराला नदीतीरापर्यंत पोंचविण्याचं काम कसं होईल कोण जाणे. त्याचीच जरा भीति वाटते.

तारि०:—दादा, तूं अगदीं त्याची काळजी करूं नको. मला सर्व वाटा पुऱ्या माहीत आहेत. मी कुमारला नीट सुरक्षित पोंचवून त्वकरच परत येतें. ईश्वराच्या मनांत आमचा अंतच करायचा असेल तर आपण सर्व शरीरानं आणि मनानं एक होऊन मृत्यूला तोंड देऊं. तुमच्या समागमांत मृत्युसुख भोगायला मी परत येईन, तेव्हां कुमाराला सुरक्षित पोंचविला अशीच आनंदाची बातमी घेऊन येईन.

चंद०:—अहाहा! तारिणी, धन्य आहें मी. अशी कुलदीपक मुलगी माझ्या पोटीं आली! माझ्या बेचाळीस पिढ्यांना खचित उत्तम स्वर्गीय गति मिळाली. बाळे, चंद्रकांताचा पक्ष घेऊन त्या दिवशीं तूं बोललीस म्हणून मी तुला नाहीं नाहीं तें बोललों याची मला क्षमा कर. [ रडतो. ]

तारि०:—( जवळ जाऊन त्याच्या गळ्याला मिठी मारून ) बाबा, बाबा, असं कां बरं बोलतां? यांत क्षमा कसली करायची? मी कुमारांना पोंचवून तुमच्या भेटीला आत्तां इतक्यांत येतें बरं. चला कुमार.

चंद०:—बरं बाळे, जा. [ तारिणी व हरनंद जातात. ]

माध०:—बाबा, शत्रुसैन्य जवळ येऊं लागलं. आपण बागेंतून उठून आंत चला. मला आनंदभुवन लढविण्याची योजना केली पाहिजे.

[ माधवाच्या खांद्यावर हात टाकून चंदनदास जातो. ]

[ पडदा पडतो. ]

## प्रवेश दुसरा.

स्थळ—आनंदभुवनावरच्या वाटेवरचें अरण्य.

[ सेनापति भागुरायण व वीरसेन प्रवेश करितात. ]

भागु०:—वीरसेना, आनंदभुवनावर आपले सैनिक गेलेच आहेत. पण त्यांच्यामागोमाग तूंही जा. वास्तविक आनंदभुवन म्हणजे कथा काय! पण बंडखोर मनुष्यं बेफाम असतात, आणि जिवावर उदार होऊन लढतात. म्हणून आपणांला जितकी सावधगिरी ठेवतां येईल तितकी ठेवली पाहिजे. शिवाय, हरनंद आनंदभुवनांत लपून दडून राहिला

आहे अशी शंका असल्यामुळं तुला डोळयांत तेल घालून वागलं पाहिजे. गेल्याबरोबर तावडतोब वेढा दे, आणि आंतून बाहेर आणि बाहेरून आंत एकही मनुष्य सोडूं नको. जर हरनंद आनंदभुवनांत असला तर तो मेल्यापेक्षां जिवंत सांपडला तर अधिक इष्ट आहे. आर्य चाणक्यांना आणि महाराजांना नंदकुळाचा शेवटचा पुरुष ठार मारण्याचं सुख, पूर्वी बहुतेकं सर्व नंद मारले तेव्हांही डोळ्यानं प्रत्यक्ष पाहायला मिळालं नव्हतं तें आज त्यांना मिळेल. जा. सर्व बंदोबस्त नीट ठेव. मीही तुझ्यामागून येतोंच.

वीर०:–(मुजरा करून) जशी आज्ञा. मी येतों. [भागुरायण जातो.]

वीर०:–महाराज चंद्रगुप्तांनीं माझ्या हातीं दिलेलं मुद्रांकित पत्र मीं अद्यापि फोडून पाहिलं नाहीं. महाराजांना शिकारींत व्यत्यय आलेला मुळींच आवडत नाहीं हें मला पुरं माहीत आहे. आर्य चाणक्य येण्याला अद्यापि अवकाश आहे. तोंपर्यंत महाराजांना त्रास कशाला द्या? असलीं कामं जर आमच्यासारख्यांच्या हातून पार पडलीं नाहींत तर मग आमचा उपयोग तरी काय? आर्य चाणक्य आले आणि महाराजांवीण त्यांचं अगदीं अडलं तर मग हें मुद्रांकित पत्र फोडतां येईल. (जातो.)

## प्रवेश तिसरा.

### स्थळ—आनंदभुवन.

[हरनंदाचा पोषाख घातलेला माधव प्रवेश करितो.]

माध०:–मीं कुमार हरनंदांना त्याच वेळीं घाई करून आनंदभुवनांतून लावून दिलं हें फार बरं झालं. नाहीं तर शत्रूचा हा वेढा फोडून बाहेर जाणं त्यांना फार कठीण झालं असतं. आणि मग राजकुमाराला आनंदभुवनाकडे घेऊन येण्याची आणि इथं लपवून ठेवण्याची बुद्धि मला कुठून झाली असा पश्चात्ताप वाटला असता. आतां म्हणावं खुशाल बसा आनंदभुवनाला वेढा घालून. आंतल्या एकन् एक माणसांचे प्राण जातील तेव्हांच आनंदभुवन हस्तगत होईल, आणि मग झालं तरी काय? ज्याच्याकरतां हा सर्व खटाटोप तो सांपडणार नाहीं तो नाहींच. खचित मी

आतां हरनंदासारखा दिसत असेन, नाहीं? हीं राजवैभवशाली वस्त्रं शत्रूंची फसवणूक करायला समर्थ आहेत. हरनंद म्हणून माझ्याशीं लढतांना जरी यांना आवेश येईल, तरी आपण हरनंदच मारला अशा समजुतीनं यांचा जीव थोडा वेळ थंड होऊन युद्ध तरी थांबेल. मी हरनंद नव्हे असं कुणीं ओळखून काढून, फिरून खरा हरनंद कोणता अशी चौकशी आणि धांवपळ सुरू होईल तेव्हां पाहतां येईल. कुमार हरनंद आणि तारिणी यांना तितकाच आणखी वेळ मिळेल पल्ला गांठायला! कुमाराचीं हीं वस्त्रं आणि हा शिरपेंच हीं नंदराजसत्तेचीं भूषणं मी अंगावर घालतों, हा त्या राजसत्तेचा उपमर्द तर होत नाहीं ना? पण असल्या सूक्ष्म धर्मांचा विचार मनांत आणण्याची ही वेळ नाहीं.

[ पडद्यांत गलबला होतो, वीरसेन प्रवेश करितो. ]

**वीर०**:–पकडा या बंडखोराला. पहातां काय?

**माध०**:–नीचा! बंडखोर कुणाला म्हणतोस? खबरदार कुणी पुढं याल तर!

**वीर०**:–अरे वः! तूं तर एखाद्या राजाप्रमाणं आज्ञा करतोस!

**माध०**:–मी राजा आहें म्हणूनच आज्ञा करितों. आज्ञेशिवाय राजाच्या तोंडून दुसरा कोणता उद्गार निघणार? ही युद्धभूमि असली तरी या ठिकाणीं माझीच आज्ञा पाळली गेली पाहिजे. अधमा, बंडखोर कुणाला म्हणतोस? आपल्या राजाची अशी अवज्ञा करतोस त्याकरितां तुझी जीभच कापून टाकली पाहिजे!

**वीर०**:–कोण हा विक्षिप्तपणा! पण अशानं राजद्रोहाचं शासन मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. लक्षांत ठेव.

**माध०**:–राजद्रोहाचं शासन तुलाच दिलं पाहिजे. पण अजूनही तूं आपल्या हातांतलं शस्त्र खालीं ठेव आणि क्षमा माग. या हरनंदाच्या हातीं प्रखर असा राजदंड या क्षणीं नसला तरी, क्षमा करण्याचा राजाधिकार चालवून मला तुला खचित जिंकतां येईल. ठेव. शस्त्र खालीं ठेव. आणि या हरनंदाची-या नंदकुलावशिष्ट क्षत्रिय वीराची-क्षमा माग. ती तुला मिळेल.

**वीर०**:–( स्वगत ) याच्या तेजस्वीपणावरून खचित हा हरनंदच असावा यांत शंका नाहीं. ( उघड ) कोण? तूंच हरनंद? वः! फारच

उत्तम झालं. दैव मला अनुकूळच म्हटलं पाहिजे. म्हणून आयता सांपडलास. सर्व मगधदेशभर गुप्त हेर पसरले असतां तूं मला परिश्रमाशिवाय अवचित या ठिकाणीं सांपडलास! माझ्या जन्माचं सार्थक झालं! याहून इष्ट अशा प्रकारची स्वामिसेवा आणखी कोणती घडणार? दुष्टा, राजलक्ष्मीनं नंदवंशाच्या देहांतला आपला अवतार केव्हांच समाप्त केला, आतां तूं शिरा ताणून कुणाला कितीही आज्ञा केल्यास तरी त्या कोण मानणार? तुला मीं बंडखोर म्हटलं तेंच योग्य! तुला आपला जीव पाहिजे असला तर तूंच शस्त्र खालीं ठेवून शरण ये. तुला प्राणाची भिक्षा घालणं न घालणं हें महाराज चंद्रगुप्त आणि आर्य चाणक्य यांच्या हातीं आहे.

माध०:—नीचा! किती वाचाळपणा करतोस? तुला क्षमा नको असेल तर शिक्षाच घे. [ त्याच्या अंगावर धांवून जातो. ]

वीर०:—काय, हरनंद जिवंत धरून देण्याची माझी इच्छा तूं पूर्ण करूं देत नाहींस तर? ठीक आहे! हरनंद जिता काय आणि मेला काय, आतां दोन्ही सारखेच आहेत. [ ते लढतात. ]

[ इतक्यांत वीरसेनाचे लोक धांवून येतात व माधवास गराडा घालतात. युद्धांत माधव जखमी होऊन पडतो. ते त्यास पकडून कैद करतात. ]

माध०:—( विवळत ) हाय, हाय! दुष्टांनो! अधमांनो! आपल्या राजाचा शेवटीं तुम्हीं घात केलांत ना! तुमच्या राजद्रोहाचा कळस झाला! ईश्वर तुम्हांला खचित दुर्गति देईल! या हरनंदाला, या तुमच्या राजाला, मारल्याबद्दल तुम्हांला घोर नरकयातना सोसाव्या लागतील!

वीर०:—इतका वेळ आज्ञा करीत होतास, आतां शिव्या-शाप दे. दोरी तुटलेल्या धनुष्यावरून फेकलेल्या बाणाप्रमाणं, राज-तेज लय पावलेल्या राजाचे शाप, त्याच्या स्वतःच्या पायावरच पडायचे! दुर्मदा, रणगंभीरा, हरनंदाच्या दंडावरचे पाश घट्ट बांधा. तुम्हीं मिळविलेलं यश फार मोठं आहे. असो, हरनंद तर हस्तगत झालाच. आतां आनंदभुवनांत आणखी जितके लोक जिवंत सांपडतील तितक्यांना एकदम कैद करा.

## प्रवेश चवथा

### स्थळ—आनंदभुवनाजवळचा बाग.

[ चाणक्य, भागुरायण व सैनिक प्रवेश करितात. ]

चाण०:—भागुरायणा, हा काय चमत्कार! चंद्रगुप्त राजधानींतून अकस्मात् गुप्त झाला म्हणतोस!

भागु०:—होय गुरुमहाराज. चंद्रगुप्तमहाराज निघून जाण्यापूर्वी थोडा वेळ मी त्यांच्या दर्शनाला गेलों होतों. पण आपणाला राजधानी सोडून कुठं बाहेर जायचं आहे, असं त्यांनीं मला सांगितलं नाहीं. मला तसं सांगितलं असतं तर मीं ठावठिकाण विचारून ठेवला असता. कारण सैन्यांच्या पुढच्या व्यवस्थेसंबंधानं मला त्यांच्याकडून आज्ञा घ्यावयाच्या होत्या. महाराज राजधानींतून नाहींसे झाले, आनंदभुवनांत बंड झाल्याची बातमी आली, आणि हरनंद आनंदभुवनांत असल्याचा संशय आला, त्याबरोबर मीं आपणाकडं निरोप पाठविला.

चाण०:—आणि तुझा निरोप पोंचण्याबरोबर मी निघून आलों. मी केदारवनांत तपश्चर्येच्या समाप्तीकरितां गेलों खरा; पण काय कारण असेल तें असो, माझं तपश्चर्येकडं लक्षच लागेना. नंदांच्या अविचारीपणामुळं झालेली राज्यक्रांतिच काय, पण माझं बाळपणापासूनचं वृत्त, गुरुगृहीं मीं व माझ्या सोबत्यांनीं घालविलेले दिवस, सर्व कांहीं आठवूं लागलं. हरनंदाला धरून मारण्याची माझी प्रतिज्ञा डळमळली असाही भास मला झाला. म्हणून त्याच पावलीं मी इकडं निघून आलों, आणि पाहतों तों चंद्रगुप्त राजधानींत नसून त्याचा पत्ताही नाहीं.

भागु०:—पण आतां काळजी करण्याचं कारण नाहीं. आपण आतां आनंदभुवनापाशींच येऊन ठेपलों आहों. वीरसेनाकडून लवकरच कांहींतरी चांगलीशी बातमी येईल. त्याच्या शौर्यावर व शहाणपणावर माझा पुरा विश्वास आहे. (वीरसेन प्रवेश करतो.) अरे, पण हा वीरसेनच स्वतः आला.

चाण०:—बोल, बोल वीरसेना, काय वर्तमान आहे तें. चंद्रगुप्त कुठं आहे!

वीर०:—चंद्रगुप्तमहाराज कुठं तरी शिकारीला गेले असावेत. निदान मजपाशीं ते असं म्हणाले. त्यांनीं हें मोहोरबंद पत्र जातेवेळीं मजजवळ दिलं. त्यांत शिकारीचं स्थान कोणचं तें बहुधा सांगितलं असावं. अगदीं आवश्यक असेल तेव्हांच पत्र फोडून वाच, असं त्यांनीं मला सांगून ठेवलं आहे. गुरुमहाराजांची आज्ञा असल्यास तें मी फोडतों.

चाण०:—आण, आण तें पत्र इकडं. माझं मन फार उतावीळ झालं आहे. ( वीरसेन त्यास पत्र देतो, चाणक्य तें फोडून वाचतो. ) काय ? 'आनंदभुवनाकडं मी गेलों' असं या पत्रांत चंद्रगुप्त लिहितो, याचा अर्थ काय ? आनंदभुवनाच्या आसपास तो कुणा सैनिकाला दिसला काय ?

वीर०:—नाहीं गुरुमहाराज. शिवाय, आनंदभुवनाच्या आसपास शिकार करण्यासारखीं रम्य स्थळंही नाहींत.

भागु०:—पण आनंदभुवनांतल्या बंडाचं काय झालं ?

वीर०:—आनंदभुवनांतलं बंड सर्व मोडलं. त्यांतल्या एकूणएक लोकांना मीं कैद केलं आहे.

चाण०:—आणि कुमार हरनंदाची काय बातमी आहे ?

वीर०:—कुमार हरनंद आनंदभुवनांतच दडून बसलेला होता. त्याला मीं पकडून आपल्याबरोबर आणलं आहे. आज्ञा होईल तर पुढें आणवितों.

चाण०:—अरे, हें महत्त्वाचं वर्तमान तूं मला आधींच कां सांगितलं नाहींस ? भागुरायणा, तुझ्या सैनिकांना आणि सेनापतींना कमी महत्त्वाचं कोणतं आणि अधिक महत्त्वाचं कोणतं याचं तारतम्य कांहींच दिसत नाहीं. आण, आण, हरनंदाला माझ्यासमोर.

[ सैनिक जखमी माधवाला आंत आणितात. ]

चाण०:—( त्याला पाहून ) काय ? हा हरनंद ? माझे डोळे फुटले कीं काय ? भागुरायणा, तुझ्या सेनापतींच्या शहाणपणाची शर्थ झाली. माझ्यापुढं भलताच एखादा मनुष्य आणून हाच हरनंद असं घडघडीत हे मला सांगतात, याला काय म्हणावं ?

भागु०:—( वीरसेनास ) वीरसेना, हा हरनंद म्हणून पुढं आणायला तुला लज्जा कशी वाटत नाहीं ? सैनिकांचं मुख्य काम लढण्याचं असलं

तरी, आपला शत्रु कोण हें कळण्याइतकं व्यवहारचातुर्य त्यांच्या अंगीं असलं तर तें त्यांना मोठंसं दूषण नाहीं. हा हरनंद हें तुला कुणीं सांगितलं ?

**वीर०:**–स्वतः त्याचं त्यानंच.

**चाण०:**–पहा, पहा याचं शहाणपण ! शत्रु स्वतःचं नांव कारण नसतां घेतो यांत कांहीं तरी कपट असावं, अशी शंकासुद्धां तुला आली नाहीं ? माझा चंद्रगुप्त जिंकलेलं राज्य असल्या मूर्ख सेनापतींच्यावर विसंबणार असला, तर तें त्याच्या हातीं फार दिवस टिकण्याची आशाच नको. काय म्हणतोस, तुझ्या शत्रूनं आपलं नांव हरनंद म्हणून तुला सांगितलं ? नांव सांगितल्याशिवाय त्याला तुझ्याशीं जसं कांहीं लढतांच येत नसेल ? [ भागुरायण व वीरसेन कुजबुजतात. ]

**माध०:**–( स्वगत ) हाच तो चाणक्य वाटतं. अहाहा, काय याचं हें तेज ! तरी पण मी जर मोकळा असतों तर नंदकुलाचा संहार करविणाऱ्या या ब्रह्मसमंदाला चांगलाच हात दाखविला असता !

**चाण०:**–अरेरे, सर्व घात झाला. या कपटनाटकाचा अर्थ मला इतकाच दिसतो कीं हरनंदाला पळून जायला वेळ मिळावा. आणि या मूर्ख वीरसेनाच्या चुकीमुळं तो त्याला मिळाला खचित. भागुरायणा, पहातोस काय ? आत्तांच्या आत्तां या वीरसेनाला कैद कर. शत्रूचं कपट न कळणाऱ्या या मंदबुद्धि सेनापतीला शत्रुइतकंच कडक शासन केलं पाहिजे.

[ भागुरायणाचे सैनिक वीरसेनास कैद करतात. ]

**भागु०:**–गुरुमहाराज, गोष्ट थोडी फसली खरी. तरी पण अजूनही साधतां येईल. आपली आज्ञा होईल तर मी स्वतः हरनंदाच्या शोधाला जातों. तो आनंदभुवन सोडून कांहीं फारसा लांब गेला नसेल. मी काय वाटेल तें करून त्याला शोधून काढतों.

**चाण०:**–पण हरनंदाचं नांव घेणारा हा कोण ?

**भागु०:**–कोणरे तूं ? बोलतोस कीं नाहीं ?

**माध०:**–मी कोण वाटेल तो असेन. तुम्हांला त्याचं काय ? मी हरनंद नव्हे असं जर तुम्हीं ठरविलं, तर मग मला दुसरा कोण वाटेल तो तुम्हीच ठरवा. तुम्हांला तें प्रियच असेल तर मी हरनंद नाहीं असं हवं

सार म्हणतो. हा मौल्यवान् पोषाख हरनंदाचा नव्हे ? हा शिरपेंच, हीं राजभूषणं हरनंदाचीं नव्हेत ?

चाण०:–छे छे, भागुरायणा, वेळ गमाविण्यांत अर्थ नाहीं. हा अधम मनुष्य तुलामलाही फसवायला पहातो आहे !

भागु०:–ठीक आहे. हा मी चाललोंच.

[ चाणक्याला नमस्कार करून थोडेसे सैनिक घेऊन जातो. ]

चाण०:–( सैनिकांना ) चला या बंदिवानाला घेऊन आनंदभुवनांत.

( सर्व जातात. )

## प्रवेश पांचवा.

स्थळ—आनंदभुवनाजवळील अरण्य.

[ वेषांतर केलेला व्यतिपात प्रवेश करितो. ]

व्यति०:–एकूण कांतिवर्म्याचं डोकं तरतरीत खरं ! त्याच्या सांगण्याप्रमाणं आनंदभुवनांत बंड झाल्याची बातमी मीं राजदरबारीं नेऊन पोंचविली मात्र. तिथं जी कांहीं तारांबळ आणि गडबड उडाली ती कांहीं सांगतां पुरवत नाहीं. कोणी चंद्रगुप्त महाराजांचा शोध करूं लागले, तों कोणी त्याच्या त्या रागीट गुरूचा शोध करूं लागले. आणि आनंदभुवनावर येण्याकरितां छोटेखानी सैन्याची रवानगीही झाली. बंडाची बातमी मीं प्रथम आणली म्हणून मला जो तो पण किती मान देत होता, आणि माझी बडेजाव ठेवीत होता ! पण आनंदभुवन धुळीला मिळालं किंवा त्यांतल्या सर्व तरण्या-म्हाताऱ्या माणसांना कैद करण्यांत आलं तरी मला लाभ काय ? हरनंद पकडून दिल्यामुळं जें बक्षीस देण्याचं राजवचन मिळालं आहे तें कसं मिळणार ? अरे, पण हा कोण मनुष्य इकडून येतो आहे ? हा लपत दडत इकडं तिकडं पहात कां येतो आहे ? हाच हरनंद नसेल ? शिकारी कुत्र्यांनीं रान वेढलं म्हणजे सावज जसं घाबरून सैरावैरा धावूं लागतं, तसा हा इकडून तिकडं तिकडून इकडं का करतो आहे ? बहुधा हा हरनंदच असेल. पण खरा हरनंद नसेना का ?

कांतिवर्म्यानं सांगितल्याप्रमाणं त्याच्यावर हरनंदाचा आळ घातला तरी पुरे. याला पकडावं आणि राजधानीकडून आलेल्या सैन्याच्या स्वाधीन करतों म्हणावं, म्हणजे कांहीं तरी लाभ झाल्याशिवाय राहणार नाहीं. [पडद्यांत जातो.]

[ कांतिवर्मा वेष पालटून प्रवेश करतो. ]

कांति०:–हरनंदाची शिकार शेवटीं माझ्या हातची गेली अं! मी स्वतःला मोठा धूर्त समजत होतों. पण असा फसलों. आनंदभुवनांत कुणी तरी पुरुष स्त्री-वेषानं लपून बसला आहे हें मींच प्रथम ओळखलं. पण माझ्या कल्पनेनं आणखी थोडी पुढं मजल मारली असती आणि तोच पुरुष हरनंद असं म्हटलं असतं तर काय मौज झाली असती! पण तें म्हणायचं सुचणार कुठून? आतां काय? हरनंद केव्हांच निघून गेला आनंदभुवनांतनं! अरे, पण हा कोण लपत दडत इकडं येतो आहे? अं! पाहूं दे बरं नीट मला! अरे, हा तर व्यतिपात! राजधानीहून परत आला वाटतं! आणि वेषांतर काय म्हणून? ठीक आहे. याची करूं या थोडीशी मौज! काय, लेंक वेषांतर करून मला फसवूं पहातो काय? पण गाढवावर जरी चौझूल घातली तरी तें ओळखल्याशिवाय का राहील?

[ पडद्यांत जातो. ]

पडद्यांतून व्यतिपात व कांतिवर्मा एकमेकांस धरून 'कसा सांपडलास? पळून जात होतास नाहीं?' असें एकमेकांस म्हणत बाहेर येतात. ]

कांति०:–कोण तूं? सांग लवकर. नाहीं तर चंद्रगुप्ताच्या सैन्याच्या स्वाधीन करीन आणि मग तुला फार जड जाईल.

व्यति०:–बोल, लवकर तूंच कोण तो. असली खोटी धमकावणी म्हटलं माझ्यापाशीं नाहीं चालायची.

कांति०:–तुला वाटलं असेल, कीं असल्या कांगाव्यानं मी सुटून जाईन म्हणून.

व्यति०:–आणि तुलाही वाटलं असेल, कीं माझा कांगावा म्हटला म्हणजे तुझं आयतंच खरं ठरेल म्हणून.

कांति०:–बोलतोस कीं नाहीं लवकर तूं कोण तें?

व्यति०:–असा जर माझ्याशीं फाजीलपणा चालविलास तर संभाळ.

कांति०:—तूं हरनंद आहेस.

व्यति०:—आणि तूंही हरनंदच आहेस.

कांति०:—थांब, तुझा हा खोटा कपटी वेषच उडवून दिला, म्हणजे तूं कोण हें तूं न सांगतां आपोआप समजेल.

व्यति०:—पण तुझी ही धडधडीत खोटी दिसणारी दाढी मीं उपटून काढली म्हणजे दिसेल कोण आहे तें आपल्या आपण.

[ दोघेही एकमेकांच्या खोट्या दाढ्या ओढून फेंकून देतात. ]

कांति०:—कोण, व्यतिपात ?

व्यति०:—कोण, कांतिवर्मा ?

कांति०:—मला तर असं वाटत होतं, कीं हरनंदच आयता हातीं सांपडला.

व्यति०:—आणि मलाही पण तीच आशा होती.

कांति०:—माझं बक्षीस तूं बुडविलंस.

व्यति०:—आणि माझं तूं बुडविलंस.

कांति०:—एकूण काय, तूं आणि मी फिरून होतों तिथंच आहों !

व्यति०:—म्हणजे तूं गुरुपदावर आणि मी शिष्यपदावर असंच कीं नाहीं ?

कांति०:—तें जाऊं देरे. आतां सिद्धसाधकपणा करायचं कारणच उरलं नाहीं. मीं सांगितलेली कामगिरी तूं चांगली बजावलीस यांत शंका नाहीं.

व्यति०:—बजावली म्हणजे, सोडतों कीं काय ? राजधानींत जाऊन तूं दिलेलीं पत्रं पोंचविलीं, आणि तोंडानं आनंदभुवनांतल्या बंडाची अशी कांहीं धामधूम उडवून दिली, कीं सगळा गांव हालून गेला. बरं, तूं काय केलंस सांग पाहूं.

कांति०:—अरे विचारतोस काय ? तुला चाबूक खायला लावणाऱ्या त्या तरुण सरदारावर तुझ्याकरितां मीं चांगलाच सूड घेतला !

व्यति०:—तो कसा ?

कांति०:—कसा म्हणजे ? त्याच्या प्रेमाच्या ताटांत माती कालवून ! अरे, प्रथम मीं चंद्रकांताचा विश्वास संपादन केला. आणि मग त्याच्या मनांत असं भरवून दिलं, कीं तारिणीचं प्रेम खरोखर त्याच्यावर नसून तिनं अंतःपुरांत ठेवलेल्या एका स्त्री-वेषधारी तरुण पुरुषावर आहे म्हणून !

[ दोघे सैनिक प्रवेश करितात. ]

प० सैनिकः—बळीनं सांगितलेला मनुष्य हाच असावा.

[ व्यतिपातास धरतो. ]

दु० सैनिकः—नाहीं तर हा असेल. [ कांतिवर्म्यास धरतो. ]

प० सैनिकः—कोणचा का असेना ! दोघेही लबाडच दिसतात. कसला तरी कट करीत होते यांत संशय नाहीं. चला, आपण दोघांनाही पकडून सेनापतींच्या स्वाधीन करूं.

[ सैनिक, कांतिवर्मा व व्यतिपात या दोघांनाही पकडून नेतात. ]

## प्रवेश सहावा.

स्थळ—ब्रह्मपुत्रा नदीच्या कांठचें अरण्य.

[ हरनंद व तारिणी प्रवेश करितात. ]

हर०:—तारिणी, आपण थोड्या वेळांत पुष्कळ मजल मारली, नाहीं ?

तारि०:—होय महाराज ! सुखी मनुष्याच्या आयुष्याप्रमाणं पायाखालची वाट कशी भराभर सरते आहे !

हर०:—पण तारिणी, तूं फार दमली असशील ! क्षणभर या झाडांच्या छायेखालीं बसून विश्रांति घे. तुझ्या कोमल शरीराला हे श्रम कसे सोसतील ?

तारि०:—नाहीं. मी मुळींच दमलें नाहीं. उलट मला असं वाटतं, कीं उरलेली वाटही याच दमांत संपवून टाकावी ! आपण नावेंत बसण्याचं ठिकाण आतां इथून एक कोसही दूर नाहीं. आपण नावेंत बसून नाव चालू झाली, म्हणजे मग मात्र माझा श्रमपरिहार होईल खरा.

हर०:—काय, नदी इतकी जवळ आली ?

तारि०:—होय महाराज !

हर०:—( सुस्कारा टाकून ) अरेरे !

तारि०:—महाराज, नदी जवळ आल्याचं आपणाला वाईट कां वाटतं ?

हर०:—तारिणी, नदी जितकी जवळ आली, तितकं आनंदभुवन आणि त्याहूनही माझी राजधानी दूर राहिली म्हणून ! छेः, तारिणी, माझ्यानं यापुढं पाऊलच घालवत नाहीं !

तारि०:–तें कां महाराज ?

हर०:–तें कां ? हा देशत्याग मला प्राणत्यागाहूनही दुःसह वाटतो म्हणून !

तारि०:–पण तो देशत्याग आपण कांहीं सुखासुखीं करीत नाहीं. दुर्दैवाच्या झंझावातानं डोळ्यांत धूळ जाऊन दृष्टि नष्ट होण्यापर्यंत मजल आली तर त्याला पाठ दिलीच पाहिजे ! अन्यायाशीं न्यायानंच भांडूं म्हटलं तर कसं चालेल ? आपला देशत्याग लवकरच संपेल महाराज.

हर०:–तारिणी, हें जरी खरं, तरी बाबासाहेब, माधव, तूं यांनीं मागं राहून त्या झंझावाताचे तडाखे कां सोसावे ? तुम्हां सर्वांना प्राणसंकटांत घालून मीं मात्र जीव वांचवावा हें मला शोभतं का ? तें कांहीं नाहीं. मी परत जाणार ! आणि जी तुम्हां सर्वांची गति तीच मीही भोगणार !

तारि०:–महाराज, आपले प्राण हे एका व्यक्तीचे प्राण नव्हेत. त्या प्राणांमध्यें नंदवंशावर प्रेम करणाऱ्या हजारों प्रजाजनांच्या सर्व भावी आशा एकवटलेल्या आहेत ! आपणाजवळ आम्हां प्रजाजनांचा तो एक मौल्यवान् ठेवाच आहे. त्याचं रक्षण करणं हेंच आपलं या वेळीं पवित्र कर्तव्य आहे. राजा हेंच प्रजेचं खरं सौभाग्य ! तें संकटांत घालण्याचा आपणाला काय बरं अधिकार ? आम्ही प्रजाजन काय, वाळवंटांतल्या वाळूच्या कणांसारखे. आमच्या प्राणांची ती काय किंमत ? पण आपल्या प्राणांवर घाला, म्हणजे तो सगळ्या देशाच्या प्राणांवर !

हर०:–तारिणी, तुम्हां सर्वांची ही राजभक्ति पाहून माझं मन खिन्न होतं.

तारि०:–तें कां ?

हर०:–प्रजाजनांनीं आमच्यावर इतकं प्रेम करावं, असे सद्गुण आमच्या अंगीं कांहीं नव्हते म्हणून ! कोण हें आमच्या प्रजाजनांचें औदार्य !

[ फिरून वाट चालूं लागतो. ]

तारि०:–महाराज, ही वाट येथून किती तरी बिकट लागली !

हर०:–होय तारिणी, तूं थांब. आपण एका लहानशा दरीच्या तोंडीं उभे असून ती पार उतरून जाण्याला हा रानवेलींचा हलता आणि अरुंद पूल येवढीच काय ती वाट आहे. पण तो पूल तरी किती खंबीर आहे हें पाहिल्याशिवाय त्यावरून दोघांनीं जाणं चांगलं नाहीं. तूं क्षणभर उभी रहा. मी त्यावरून पलीकडे एकवार जाऊन पाहतों आणि मग तूं ये.

[ हरनंद पुलावरून पलीकडे जातो. इतक्यांत भागुरायण व इतर सैनिक येतात. ]

सैनि०:–(हळूच) सेनापतीसाहेब, ती पहा आपली शिकार! हीच तारिणी.

भागु०:–( गर्जून ) होय, तोच हरनंद! हा पहा, मी आतां पकडतों त्याला.

तारि०:–( पुढें होऊन ) कोण तूं? या ठिकाणीं कां आलास?

भागु०:–तारिणी, तुझ्या राजभक्तीची तूं शर्थ केलीस. पण माझ्या राजभक्तीलाही मला संभाळलंच पाहिजे.

तारि०:–ठीक आहे. खुशाल संभाळ. पण ही पहा, मी या वेलींच्या पुलावर अशी उभी रहाणार! स्त्री ही नाजूक आणि चंचल असते, अशी तुम्हां पुरुषांची समजूत असते नाहीं? पहा. ही मी या पुलावर अशी अढळ उभी रहाणार, आणि माझ्या या हातांत शस्त्र धरण्याची जोंपर्यंत शक्ति आहे तोंपर्यंत, चांडाळा, राजघातक्या, तुझा पायही या पुलावर मी पडूं देणार नाहीं. संभाळ!

भागु०:–तारिणी, तुझ्यासारख्या समंजस स्त्रीनं असं हट्टाला पेटावं हें नीट नाहीं. पुरुषांचीं कामं पुरुषांनीं करावीं. त्यांत स्त्रियांनीं पडूं नये. तुझ्याही मनांत राजभक्तीचा उत्कर्ष व्हावा हें योग्यच आहे. पण हातांत शस्त्र धरून तूं पुरुषाशीं लढण्याचा प्रसंग आणावा हें कांहीं नीट नाहीं!

तारि०:–हा मायावी उपदेश मला पटेल, आणि मी कर्तव्यपराङ्मुख होईन, ही तुझी आशा व्यर्थ आहे! दुष्टा, माझ्या राजाच्या प्राणांवर संकट आलं असतां, माझा हात धड असतां, आणि हातांत हें असलं शस्त्र असतां, राजभक्तीचं नुसतं रडगाणं गात मीं मुळुमुळू रडत बसावं, असला उपदेश मी ऐकेन काय? स्त्रीच्या हातांत तरवार असली म्हणून ती शत्रूच्या अंगचं रक्त काढण्याचं विसरेल असं नाहीं. या निर्जीव तरवारीला जर आपलं कर्तव्य चांगलं कळतं, तर मलाही खचित कळेलच. माझ्या राजाचं रक्षण, मी स्त्री असलें तरी, मला होईल त्या रीतीनं केलंच पाहिजे!

भागु०:–अरेरे! काय करूं? या स्त्रीनं हा अपयशाचा कठीण प्रसंग आणला! कारण स्त्रीशीं लढावं लागणं हें पुरुषाला अपयश नव्हे तर काय? तारिणी, जशी तुझी इच्छा. [ तीं लढतात. ]

हर०:–( पुलावरून ) हां हां ! तारिणी, हें काय !

तारि०:–हां हां महाराज, आपण येऊं नका. जा, निघून जा. माझी वाट न पहातां तडक निघून जा. नदीकांठीं नाव तयार आहे. तींत बसा आणि जा. नका, परत फिरूं नका ! तुम्हांला माझी शपथ आहे ! तुम्हांला बाबांच्या गळ्याची शपथ आहे. महाराज ! नका, नका परत येऊं. मी या सेनापतीचा समाचार घेण्याला समर्थ आहें.

भागु०:–हा नंदकुलाधमा हरनंदा ! प्रथम स्त्री-वेष घेऊन पळून गेलास, आणि आतां स्त्रीला लढायला मागं टाकून एकटा प्राण बचावण्याकरितां निघून जातोस ? धिक्कार तुझ्या पुरुषत्वाला !

हर०:–छे ! छे ! मला परत फिरण्याला तुझी निंदा नको आहे. हा पहा मी आलोंच. तोंपर्यंत हात आवर ! त्या स्त्रीला जर यत्किंचित्‌ही दुखापत झाली तर प्राणच घेईन.

तारि०:–महाराज ! नका हो नका ! येऊं नका ! ( भागुरायणास ) अधमा, चल. माझ्याशीं लढ. तुझे प्राण घेण्याला कुमार हरनंदच कशाला हवेत ?

[ तीं दोघें लढतात; हरनंद परत पुलावर येतो, तोंच सैनिक पुलावर चढतात व पूल तुटून सर्व खालीं पडतात. भागुरायणाचे सैनिक हरनंदास पकडतात आणि तारिणीची तरवार काढून घेतात. ]

तारि०:–( दुःखावेगानें ) हाय ! हाय ! सर्व घात झाला. शेवटीं दुष्टांनीं आपला डाव साधला ! [ पडदा पडतो. ]

## प्रवेश सातवा.

### स्थळ—आनंदभुवनाजवळचें अरण्य.

[ चंद्रगुप्त प्रवेश करतो. ]

चंद्र०:–गुरुमहाराजांजवळ मीं कोणती प्रतिज्ञा केली आणि तारिणीला कोणतं वचन देऊन बसलों ? प्रतिज्ञाही मोडवत नाहीं आणि वचनही मोडवत नाहीं ! रानगव्याच्या शिंगांच्या पेंचांत सांपडलेल्या

पारध्याप्रमाणं माझी बिकट स्थिति झाली आहे. खरोखर, या बिकट स्थितींत रहाण्यापेक्षां मला या वेळीं मरणच अधिक प्रिय वाटतं. खचित माझ्या-हातून हरनंद मरूं नये अशीच ईश्वराची इच्छा दिसते. कारण माझ्या शेंकडों सैनिकांपैकीं आणि हेरांपैकीं कुणाच्याही हातीं न लागतां तो एक-दम अकस्मात् माझ्याच दृष्टीला कां पडावा? आणि तो दृष्टीस पडला त्याच वेळीं त्याचं प्राणदान मागण्याकरितां तारिणीही जवळ कां असावी? अरेरे, तारिणीला येण्याला जर क्षणभरही विलंब झाला असता, तर हरनंदाचा बळी माझ्या तरवारीनं घेतला असता, माझी प्रतिज्ञा पुरी झाली असती, आणि तारिणीलाही मला बोलायला कांहीं जागा राहिली नसती. खरोखर, जड सृष्टीला प्रत्यक्ष आपल्या पाठीवर घडून येणाऱ्या गोष्टी कळत नाहींत. पण दैवी भवितव्यता ही त्रिकालज्ञ आहे. तिला अंतर्ज्ञानानं हरनंदाच्या आणि माझ्या युद्धाची बातमी कळली असावी! आणि म्हणूनच तिनं तारिणीला हाताला धरून ऐन वेळीं आमच्या युद्धाच्या जागीं आणली. खचित, भवितव्यतेचे माझ्या विरुद्ध बेत याच्याही आधींपासून चालले असावे! आणि म्हणूनच प्रतिज्ञेचा पहिला शब्द माझ्या तोंडून निघतांच एका अनोळखी सत्पुरुषाच्या तोंडून ती प्रतिज्ञा पुरी करण्याच्या मार्गांत तिनं मला प्रतिबंध करविला. अरे, पण भवितव्यता माझी अजून पाठ सोडीत नाहीं. कारण पहा, तोच सत्पुरुष फिरून माझ्याकडे येत आहे.

[ बळि प्रवेश करितो. ]

बळि०:—राजा! तूं माझ्या पत्रांतल्या वृत्तांताचं मनन केलंस काय?

चंद्र०:—( त्रासून ) खचित या वेळीं मला वेड लावायला एवढाच विचार काय तो कमी होता. सांईमहाराज! आपणाला जर माझा जन्म-वृत्तांत विदित होता, तर तो आपण पत्रांत सगळाच कां लिहिला नाहीं? अरेरे! आपणाला माझा छळ करायचा होता, म्हणूनच आपण मला सर्व गोष्टी एकदम सांगितल्या नसाव्यात.

बळि०:—छे! राजा, मी तुझा छळ कसा करीन? पण जिज्ञासा उत्कट झाल्यानं ज्ञानमार्ग सोपा होतो. शिवाय, तुझा सर्व वृत्तांत कळ-विला तर तुला पश्चात्तापाचं दुःख झाल्याशिवाय रहाणार नाहीं, आणि तें

दुःख होईल तितकं लांबवावं असं मला वाटलं. पण सर्वच गोष्टी आतां निकराला आल्या. तुझ्या सैनिकांनीं आनंदभुवन हस्तगत केलं. स्वतः चाणक्यही आनंदभुवनाला येऊन पोहोंचला असेल.

चंद्र०:—फिरून हें भवितव्यतेचंच करणं यांत शंका नाहीं. एरवीं गुरुमहाराजांना शोधायला मी आलों असतां त्यांची माझी चुकामूक तरी कां झाली असती? काय म्हणतां? गुरुमहाराज आनंदभुवनांत येऊन पोंचले असतील?

बळि०:—एवढंच नव्हे, तर आपण तिथं जाऊन पोंचण्याला विलंब करूं तर चंदनदास आणि माधव यांच्या शिरच्छेदाच्या शिक्षा तो अमलांतही आणील. चंद्रगुप्ता, तुझ्या हातून स्वतःच्या कुळाचा संहार तर होऊन चुकलाच; पण अजूनही एका नंदकुलोत्पन्न पुरुषाचे प्राण तुला वांचवितां येतील, ते तरी वांचीव!

चंद्र०:—काय? माझ्या कुळाचा संहार मीं केला?

बळि०:—होय. निष्ठुर भवितव्यतेनं तुझ्या हातून तो करविला खरा.

चंद्र०:—तो कसा?

बळि०:—ऐक. राजा, घाबरूं नको. मन घट्ट करून मी काय सांगतों तें ऐक. तूं महाराज धननंदाचाच पुत्र. तुझं खरं नांव बलनंद. फिरून सांगतों, घाबरूं नको. पण मी म्हणतों यांत एक अवाक्षरही खोटं नाहीं. मींच तुला लहानपणीं आंगाखांद्यावर खेळविलं. भयंकर संशयाच्या भोंवऱ्यांत सांपडल्यामुळं तुला अरण्यांत नेऊन तुझा वध करण्याकरितां नंदमहाराजांनीं माझ्याच स्वाधीन केलं! हिमालयावरच्या गौळवाड्यांत मींच तुला ठेवलं, आणि दुर्दैवानं तिथून तूं नाहींसा झाल्यावर दुःखी होऊन वैतागून फिरून तुझ्या बापाचं तोंडही पहाणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून मी यात्रेला निघून गेलों. पण दैवाचीच करणी म्हणून नंदवधानंतर तूं भरविलेल्या पहिल्या राजसभेच्या वेळींच मी राजद्वारापाशीं परत येऊन पोहोंचलों. मी मायावी नसून माझ्या हृदयांत तुझ्याबद्दल प्रेमच सांठविलेलं आहे. हें पहा, तुझ्या हातचं एक रक्षाबंधन मीं आज इतकीं वर्षे उराशीं बांधून ठेविलं आहे तें. (रक्षाबंधन काढून दाखवितो.) राजा, सांग आतां. आत्मघाताशिवाय तुझी प्रतिज्ञा कशी शेवटास जाईल?

चंद्र०:–(दुःखानें) हाय हाय! ही अमृतवृष्टि, का हा वज्रपात! प्रतिज्ञा सफल करण्याकरितां मला आत्मघात करावा लागला तर तो आतां मला इष्टच आहे. मीं पूर्वजन्मीं असं कोणतं पातक केलं होतं, कीं माझ्या हातून माझ्या पित्याचा आणि माझ्या कुळाचा नाश व्हावा? मातेच्या उदरीं येऊन तिला वैधव्य देऊन खचित मीं तिचे फार उपकार केले!

बलि०:–राजा, असं दुःख करूं नको. तुझी माता तुझ्या पित्याच्या आधींच हें जग सोडून गेली होती. पितृवधानं तूं तिला वैधव्य दिलं नाहींस, पण तुझ्या पित्यानं तुझ्या मातेचा जो छळ केला त्याचा तूं योग्य सूडच घेतलास! चल, मी तुला ती सर्व हकीकत वाटेनं सांगतों!

चंद्र०:–नाहीं. माझ्यानं येथून पायही काढवत नाहीं.

बलि०:–बलनंदा! तूं वेडा आहेस. आपण सर्व भवितव्यतेच्या हातचीं खेळणीं आहोंत. झालेली हानि परत येत नाहीं, पण होणारी हानि तरी वांचविणं तुझं काम आहे. तूं क्षणभर विलंब करशील तर तुझ्या हातून हरनंदाची हत्या खचित होईल. हरनंद, चंदनदास, तारिणी, माधव यांचे प्राण केवळ सुईच्या अग्रावर लोंबत राहिले आहेत हें तूं विसरलास वाटतं? चल. तूं नसल्यानं तिकडं केवढा अनर्थ होऊं घातला आहे याची कल्पना कर.

चंद्र०:–(दचकून) होय. खरंच तें मी विसरलोंच होतों. चला.

[जातात.]

## प्रवेश आठवा.

स्थळ—आनंदभुवन.

[चाणक्य आसनावर बसला आहे. भागुरायण जवळ व सैनिक दूर उभे आहेत.]

चाण०:–भागुरायणा, अखेर हरनंदाला जिवंत धरण्याचं श्रेय तूंच मिळविलंस!

भागु०:–गुरुमहाराजांच्या कृपेनं काय झालं तें खरं.

**चाण०:**–आनंदभुवनांतले सर्व राजद्रोही लोक माझ्या समोर आण. या चाणक्याच्या आज्ञा उल्लंघणाऱ्या धैर्यशील व्यक्ती मला पाहिल्याच पाहिजेत. केवळ धैर्य दाखविल्यानं आज्ञेचं उल्लंघन केल्याची शिक्षा चुकत नाहीं; पण धैर्य दाखविणारा शत्रु असला तरी त्याचं कौतुक वाटल्याशिवाय रहात नाहीं. [ चंदनदासाला शिपाई आंत आणतात. ]

**भागु०:**–हा पहा, महाराज, राजद्रोही चंदनदास. यानंच हरनंदाला आनंदभुवनांत लपवून ठेवलं.

**चाण०:**–त्याचं प्रायश्चित्त तो लवकरच भोगील. ( स्वगत ) पण या वृद्ध गृहस्थाचा चेहरा मला पूर्वी कुठं तरी पाहिल्यासारखा वाटतो. आणि याचं नांवही कानाला परिचित आहे. याला पाहिल्याबरोबर मला एकदम लहानपणची आठवण कां बरं झाली ? ( उघड ) चंदनदासा, तूं दिसतांना भला दिसतोस. तुझ्या हातून दुष्कर्म व्हावं अशी तुझी मुद्रा दिसत नाहीं; असं असतां माझी–चाणक्याची आज्ञा मोडून, हरनंदाला आश्रय देण्याची बुद्धि तुला कां झाली ?

**चंद०:**–( हंसून ) तुझी आज्ञा अमान्य करणं हें दुष्कर्म नव्हे म्हणून. उलट मी असं म्हणतों, कीं मीं सर्व जन्मांत जर एखादं पुण्यकारक असं कृत्य केलं असलं तर तें कुमार हरनंदाला आश्रय देणं हेंच होय. पण अरेरे ! कुमार हरनंदाला अपमानास्पद असे हे शब्द मीं कसे उच्चारले ? काय ? मी कुमाराला आश्रय देणार ? शिव शिव ! राजाचं प्रजेनं आदरातिथ्य करणं याला आश्रय देणं कसं म्हणावं ?

**चाण०:**–पण नंदराजांचा संहार होऊन चंद्रगुप्त राजसिंहासनावर बसला ही गोष्ट तुला माहीत होती कीं नाहीं ? नवीन राजाची आज्ञा अप्रिय असली, तरी ती पाळणं तुझं कर्तव्य होतं कीं नाहीं ?

**चंद०:**–( तिरस्कारानं हंसून ) चाणक्या, तूं स्वतःला विद्वान् नीतिवेत्ता म्हणवितोस आणि तुला इतकी साधी गोष्टही कळूं नये काय ? कीं भक्ति ही मनावर अवलंबून असते; मग ती दिव्य दैवताची असो किंवा राजदैवताची असो. चंद्रगुप्तानं युद्धांत जय मिळवून नंदांचं सिंहासन बळकावलं म्हणून स्वतःला वाटेल तर त्यानं राजा म्हणवून घ्यावं. आणि

त्याला राजा म्हणणारे इतर हजारों दुबळे प्रजाजन मिळतील. पण माझ्या जिभेवर जोंपर्यंत माझ्या मनाची सत्ता चालेल तोंपर्यंत, चंद्रगुप्ताला राजा असं मी कधींही म्हणणार नाहीं. राजद्रोही अधम असंच म्हणेन. माझ्या हृदयसिंहासनावर पूर्वीं नंदमहाराज राजे म्हणून अधिष्ठित होते; त्यांच्या अवतारसमाप्तीनंतर कुमार हरनंदाची आतां त्या सिंहासनावर स्थापना झाली आहे. आणि तें त्यांचं सिंहासन इतकं अढळ आहे, कीं एक सोडून दहा पापी चंद्रगुप्त, आणि त्यांना खोटी राजनीति शिकवून नरकमार्गाला प्रवृत्त करणारे तुझ्यासारखे एक सोडून दहा चाणक्य उत्पन्न झाले तरी तें त्यांचं सिंहासन कधींही डळमळणार नाहीं !

चाण०:—( स्वगत ) याच्या राजभक्तीच्या तेजानं खरोखरच मी दिपून जाण्याच्या बेताला आलों. अमात्य राक्षसाच्या जोडीला शोभणारा हा करारी राजभक्त दिसतो. या चंदनदासाचा आवाज खचित माझ्या परिचयाचा आहे. मी याला बाळपणचा वृत्तांत विचारूं का ? पण नको, अजूनही थोडं दमानं घ्यावं. माझा क्रोध व निश्चय डळमळला असं दिसतां कामा नये. ( उघड ) भागुरायणा, याच्याशीं अधिक बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तुझा दुसरा बंदिवान् पुढं येऊं दे. (सेवक जखमी माधवाला पुढं आणतात.) कायरे ए सोंगाड्या ? बोल, तूं कोण ? हरनंदाचं सोंग करून आम्हांला फसविण्याचा अपराध अद्यापि कबूल कर.

माध०:—चाणक्या, तुला फसविण्यांत अपराध घडला असं मी मुळींच मानीत नाहीं. राजपुत्र हरनंदाची सुटका होण्याला जें जें म्हणून योग्य तेंच आजवर मीं कर्तव्य म्हणून केलं, आणि या देहांत जीव आहे तोंपर्यंत यापुढंही करीन हीच माझी प्रतिज्ञा.

चंद०:—कोण बोलतं आहे तें ? अहाहा ! असले प्रौढ आणि उदार शब्द माझ्या सुपुत्राच्या तोंडून निघालेले ऐकून मी आज धन्य झालों. ये, ये बाळा माधवा ये, मला तुला कडकडून आलिंगन देऊं दे. मीं आजन्म पाळलेल्या नंदराजभक्तीच्या व्रताची सांगता तूं केलीस. तूं पितृ-ऋण सर्व फेडलंस.

[ ते दोघे अलिंगन द्यावयास पुढें होतात; तोंच सैनिक त्यांचे पाश खेंचून त्यांना मागें ओढतात. ]

चाण०:—जसा पिता तसा पुत्र. ठीक आहे. दोघेही एकच शिक्षा भोगतील. [ सेवक तारिणीला घेऊन येतात. ]

भागु०:—गुरुमहाराज, या राजद्रोही कुळाची परंपरा अजून संपली नाहीं. ही पहा तारिणी! या चंदनदासाची मुलगी आणि माधवाची बहीण. सर्व घराण्यानं राजद्रोहाचा एकच कित्ता गिरविलेला दिसतो.

तारि०:—अधमा, तूं राजाधिकारी असलास तरी मला टाकून बोलण्याचा तुला अधिकार नाहीं. राजद्रोही कोण? तूं का मी? तुला आपल्या चंद्रगुप्तराजाचा अभिमान आहे, तसाच माझ्या राजपुत्राचा—हरनंदाचा अभिमान मला आहे.

चाण०:—भागुरायणा, या स्त्रीला तुम्हीं कां प्रतिबंध केलात?

भागु०:—महाराज, हरनंदाचा शोध काढीत जात असतां केदारवनाच्या मध्यभागीं हरनंदाच्या बरोबर ही स्त्री सशस्त्र अशी मला आढळली.

चाण०:—ती सशस्त्र होती हाच तिचा अपराध?

भागु०:—नाहीं, याहूनही मोठा आहे. आम्ही हरनंदाला धरण्याकरितां आलों असं पहातांच ही स्त्री शस्त्र सावरून आमच्या अंगावर आली. एवढंच नव्हे, तर ज्यावरून केवळ एका माणसाला जायला वाट होती, अशा वेलींच्या पुलापलीकडे हरनंदाला पळवून ही स्वतः पुलाचं रक्षण करीत उभी राहिली.

चाणः०—मग?

भागु०:—स्त्री अवध्य आहे, तिच्यावर शस्त्र धरूं नये, हा सूक्ष्म धर्म पाळण्याची ती वेळ नसल्यानं, स्वतः मी वेलींच्या पुलावर चालून जाऊन—

चाण०:—काय, तिनं तुला शेवटीं युद्ध करायला लावलं?

भागु०:—होय, युद्ध करायला लावलं एवढंच नव्हे, तर स्वतःही तिनं इतकं निकराचं युद्ध केलं, कीं मी रणांगणावर एखाद्या अनुभविक योद्ध्याबरोबर लढतों आहे कीं काय, असंच मला क्षणभर वाटलं.

चाण०:—तारिणी! स्त्रियांनीं असं राजकारणांत पडणं बरं का? तूं स्त्री म्हणून मी तुला सौम्यपणानं विचारतों.

तारि०:—काय? राजकारण तें काय असतं? मला त्याचा अर्थ मुळींच कळत नाहीं. मला एवढंच कळतं, कीं आपला विशुद्ध पिता, आपला

प्रेमळ बंधु, हे ज्या नीतिमार्गानं जातील त्या नीतिमार्गानं जाणं हें कोणत्याही कुलीन कुमारिकेचं कर्तव्य आहे.

**चाण०:**—पण हातांत शस्त्र घेऊन लढणं हें कांहीं स्त्रियांचं काम नाहीं.

**तारि०:**—तें काय म्हणून? स्वतःचे प्राण किंवा स्वतःइतकेच प्रिय असणारे दुसऱ्याचे प्राण यांचं रक्षण त्यावीण होत नसलं, तर स्त्रियांनीं शस्त्र कां घेऊं नये?

**चाण०:**—अस्सं? तूं स्त्री म्हणून तुला मृत्यूची शिक्षा देतां येत नाहीं इतकंच. पण तूं स्त्री असूनही राजाज्ञा उल्लंघिल्याबद्दलचं शासन तुला भोगावं लागेल.

**तारि०:**—त्याला मीं कधीं नाहीं म्हटलं? मला तें हवंच आहे. आपल्या बापाभावांबरोबर कष्ट सोसणं हेंही कुलीन कुमारिकांचं कर्तव्यच आहे.

**चाण०:**—हं:! जशी खाण तशी माती! कडुलिंबावर वाढलेली गुळवेल अधिक कडूच होणार! असो, भागुरायणा! आण, हरनंदाला माझ्या-समोर आण! [ सेवक हरनंदाला आणतात. ]

**चाण०:**—हरनंदा, तूं आपले प्राण वांचविण्याकरितां पळून गेलास, क्षत्रिय असतां स्त्रीवेषही घेतलास, पण शेवटीं या चाणक्याच्या हातीं सांपडलासच कीं नाहीं? भोग आतां आपल्या कर्माचीं फळं!

**चंद०:**—चाणक्या, रक्तप्राशनानं तहान भागविणाऱ्या राक्षसा! अजून तरी आपला संहार पुरे कर! नंदवंशांत जन्माला येण्याशिवाय या सुकुमार कुमारानं तुझा दुसरा कोणता अपराध केला? आणि स्वतः नंदांनीं झालं तरी तुझा असा काय घोर अपराध केला होता? केवळ आपल्या अपमानाचा सूड घेण्याकरितां तूं पूर्वी केलीस इतकी हत्या पुरे नाहीं का झाली? ब्राह्मणानं इतकं तामसी व्हावं हा कोणत्या स्मृतींतला किंवा नीतिग्रंथांतला धर्म? स्वतः मी, माझा सुपुत्र, माझी ही आवडती कन्या या सर्वांचे प्राण नंदकुळाच्या भरतीला घे. पण या राजकुमाराचे प्राण वांचीव!

**हर०:**—बाबासाहेब, कशाला या पाषाणहृदयी ब्रह्मसमंदापुढं माझ्या-करितां याचना करून आपली जीभ विटाळतां? या जगांत राहून आतां

मला तरी काय करायचं आहे? नंदघराण्यावर जर खरोखरच ईश्वरी क्षोभ झाला असला तर होऊं दे. त्याचा पुरा निःपात होऊं दे! मात्र कर्मविपाक होऊन फिरून जर मला जन्म यायचा असला, तर बाबासाहेब, आपल्यासारख्या सत्त्वनिष्ठ महात्म्याच्या पोटीं यावा इतकी मात्र माझी परमेश्वराला प्रार्थना आहे!

चाण०:—दुसऱ्या जन्मांत इतरांच्या पोटीं येऊन नंदवंश खुशाल वाढो. मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. या जन्मीं नंदवंशाचा निःपात करीन ही माझी प्रतिज्ञा, आणि ती मीं शेवटाला नेली. भागुरायणा, तारिणीशिवाय सर्वांचा एकदम शिरच्छेद कर. हा चाणक्य आज धन्य झाला! [ बळिराम आणि चंद्रगुप्त प्रवेश करितात.]

बळि०:—चाणक्या! स्वतःच्या जिभेनं उच्चारलेला तुझा धन्यवाद व्यर्थ आहे. तुझी प्रतिज्ञा शेवटाला कधींही जाणार नाहीं. अरे, अशा आसुरी प्रतिज्ञा करण्याची बुद्धि तुझ्यासारख्या तामसी मनुष्याला ईश्वर केवळ लीलाप्रियत्वामुळं देतो खरा, पण त्या प्रतिज्ञा सफळ करण्याचं सामर्थ्यही तुझ्यासारख्याला देण्याइतकं त्याचं लीलाकौतुक खचित बोकाळलं नाहीं.

चाण०:—माझ्या भाषणाला विघात करणारा हा कोण? काय, याचा आवाज मला ओळखीचा वाटतो! ( चंद्रगुप्ताकडे पाहून ) चंद्रगुप्ता, तूं इतके दिवस कुठं होतास? तूं नसल्यानं हें सर्व अप्रिय काम मला करावं लागलं. तुला प्रतिज्ञेचा विसर पडला काय? तुला प्रतिज्ञापालनाच्या आधीं मृगया कशी आठवली?

चंद्र०:—नाहीं. गुरुमहाराज, मला प्रतिज्ञेचा विसर पडलेला नाहीं. याविषयीं आतांच मी आपली खात्री करून देतों.

तारि०:—चंद्रकांत! तुम्ही पुन्हां एकवार आमच्या मदतीला वेळेवर धांवून आलां. मला दिलेल्या वचनाची मी तुम्हांला फिरून आठवण देतें याची क्षमा करा, पण कुमार हरनंदाचे प्राण वांचवा.

चंद्र०:—तारिणी, तूं काळजी करूं नको. तुला दिलेल्या वचनाला मीं प्राणांपलीकडं जतन केलं आहे. तें वचन या देहांत प्राण आहेत तोंपर्यंत खोटं ठरणार नाहीं.

चंद्र०:—अरे, हा तर चंद्रकांताचा आवाज, आणि हा चाणक्य चंद्रगुप्त कुणाला म्हणतो?

चाण०:—चंद्रगुप्ता, ही स्त्री चंद्रकांत कुणाला म्हणते?

चंद्र०—तें माझंच नांव गुरुमहाराज! आपणापाशीं राहून शिष्यत्व पत्करण्यापूर्वी मी याच आनंदभुवनांत होतों, त्या वेळीं माझं नांव चंद्रकांत असं होतं. तेंच थोडं बदलून मीं आपणाजवळ चंद्रगुप्त असं नांव धारण केलं, किंवा आपणच तें नांव मला दिलं म्हटलं तरी चालेल!

तारि:०—काय, महाराज, आपणच चंद्रगुप्त?

चंद्र०:—होय. तारिणी, नवीन संपादलेल्या माझ्या राजैश्वर्याच्या उपाधीचा मळ माझ्या मनाला लागला तेवढा पुरे, तुझ्या मनाला तो लागू नये. पूर्वी माझ्या अनाथ दशेंत अज्ञातवासांत जें निःस्वार्थी प्रेम तूं माझ्यावर केलंस त्या शुद्ध प्रेमबंधनांत असतांच मीं तुला आपली सहधर्मचारिणी करावी, या इच्छेनं मीं राजा झाल्याची गोष्ट तुझ्यापासून गुप्त ठेवली. माझं हें कपट असलं तरी केवळ शुद्ध प्रेमाची आकांक्षा त्याच्या मुळाशीं होती म्हणून त्या कपटाची मला तूं क्षमा कर.

चंद०:—पहा पहा! तारिणी, तुझ्या प्रेमांधत्वाचा हा परिणाम! मला त्याच वेळीं चंद्रकांताच्या कपटी, घातकी वर्तनाचा संशय आला म्हणून त्याच्याशीं भाषण करूं नको म्हणून तुला मीं आज्ञा केली. खचित चंद्रकांत तुझ्या प्रेमाखातर आनंदभुवनाला परत आला नाहीं, तर कुमार हरनंदाच्या शोधाकरितां. धिक्कार असो चंद्रकांता तुला!

चंद्र०:—बाबासाहेब, आपण माझा धिक्कार विनाकारण करितां. केवळ तारिणीच्या प्रेमाकरितां मी आनंदभुवनाला परत आलों होतों, आणि म्हणूनच तारिणीच्या विनंतीला मान देऊन हरनंदाचे प्राण वांचवीन असं मीं तिला वचन दिलं.

चाण०:—काय, चंद्रगुप्ता? तूं आपली प्रतिज्ञा पाळणार आहेस ती अशीच वाटतं? विश्वासघातक्या, शिष्याधमा, माझ्या गुरुदक्षिणेची तूं फार चांगली फेड केलीस!

चंद्र०:—गुरुमहाराज, नाहीं. मी वचनपराङ्मुख झालों नाहीं. हरनंद माझ्या सैनिकांनीं धरून आणलाच आहे. त्याचा शिरच्छेद आपणाला

आतां सहज करितां येईल. पण केवळ हरनंदाला मारण्यानं माझ्या प्रतिज्ञेची जी सफळता होणार नाहीं ती मात्र मी स्वतः करणार आहें.

**चाण०**:—ती कोणती ?

**चंद्र०**:—नंदकुळांतील यच्चयावत् पुरुष मारण्याची माझी प्रतिज्ञा आहे, पण एकटा हरनंद मारून ती पुरी होणार नाहीं.

**चाण०**:—मग ती कशी पुरी होणार ?

**चंद्र०**:—गुरुमहाराज, पहा ही अशी ! ( स्वतःच्या मानेवर तरवार ठेवतो. )

**चाण०**:—( आसन सोडून उठतो व चंद्रगुप्ताचा हात धरतो. ) हां हां ! चंद्रगुप्ता ! ( तारिणी रडूं लागते. ) तरवार परत घे अशी तुझ्या गुरूची तुला आज्ञा आहे. हें काय !

**बळि०**:—हें काय ? हा तुझ्या राक्षसी प्रतिज्ञेचा, तुझ्या अलौकिक शिष्यभक्तीचा परिणाम !

**चाण०**:—तो कसा ?

**बळि०**:—तो कसा ? ऐक तर. अरे, हा चंद्रगुप्त किंवा चंद्रकांत खरोखर कोण आहे हें तुला माहीत नाहीं !

**चाण०**:—मग तो कोण, आहे तरी कोण ?

**बळि०**:—कोण ? हा हरनंदाचा सापत्न वडील भाऊ. धननंद महाराजांच्या वडील राणीपासून—मुरादेवीपासून—झालेला मुलगा ! दुर्दैवानं राणीवर अवकृपा होऊन धननंद महाराजांनीं रागाच्या आवेशांत रानांत नेऊन सोडून देण्याकरितां माझ्या स्वाधीन केला तोच हा राजकुमार ! हिमालयपर्वताच्या गौळवाड्यांत लहानाचा मोठा झाला आणि चंद्राच्या प्रकाशांत सुखरूप सांपडला म्हणून चंद्रगुप्त नांव पावला तोच हा राजकुमार ! आनंदभुवनामध्यें अज्ञातवासांत राहून अग्निहोत्राच्या कुंडांत अग्नि रक्षण करणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणं ज्यानं पराक्रमाची आकांक्षा मनांत बाळगिली तोच हा राजकुमार ! आणि अखेर, चाणक्या, ज्यानं तुझं शिष्यत्व पत्करून पराक्रम करून मगध देशाचं राज्य जिंकलं तोच हा राजकुमार !

**चंद्र०**:—छे ! छे ! हें स्तुतिपर वर्णन कानाला कसं तापलेल्या तेलाप्रमाणं लागतं ! पितृघातक्या चंद्रगुप्ता ! ऐकलंस आपल्या हतभागी चरित्राचं

वर्णन ? गुरुमहाराज, आपली प्रतिबंधक आज्ञा परत घ्या. नंदकुळाचा अशेष निःपात व्हावा अशी ईश्वराचीच इच्छा दिसते. म्हणूनच त्यानं माझ्या बाबांना मला लहानपणीं टाकून देण्याची बुद्धि दिली. म्हणूनच त्यानं माझ्या हातून नंदकुलाचा संहार घडविला. आणि म्हणूनच माझ्या हातून ही घोर प्रतिज्ञाही करविली. पितृघात, बंधुघात अशा घोर पातकांच्या स्मृतिरूपी खदिरांगारावर सदैव होरपळत रहाणारा हा चंद्रगुप्ताचा आत्मा राज्यसुख कसं भोगणार ? [ गुडघे टेकून तरवार मानेवर ठेवतो. ]

चाण०:–(त्याचा हात धरून) हां हां! चंद्रगुप्ता, तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. असा आत्मघात करूं नको. हं गूढ मला उकललंच पाहिजे.

बाळि०:–चाणक्या, हें गूढ उकलणं फारसं कठीण नाहीं. हें पहा चंद्रगुप्ताच्या हातांतलं रक्षाबंधन, मीं आजवर आपल्या हृदयाशीं जतन करून ठेवलं तें. चंद्रगुप्ता ये, तुझ्या हातांत बांधलेलं रक्षाबंधन चाणक्याला पाहूं दे.

चाण०:–खचित मला तें पाहिलंच पाहिजे. चंद्रगुप्ताला शिष्य म्हणून मीं जवळ केला, त्याच वेळीं तो एखादा राजपुत्र असावा असं त्याचं तेज पाहून मला वाटलं. पण तो प्रत्यक्ष नंदपुत्र असावा अशी मला कल्पनाही नव्हती. (चंद्रगुप्ताचें रक्षाबंधन पाहून.) होय, हें आणि तें रक्षाबंधन एकच आहे यांत शंका नाहीं.

चंद्र०:–अहाहा ! हा खचित कांहीं तरी ईश्वरी योगायोग खरा. मीं कुमार हरनंदाजवळ नंदमहाराजांची अखेरची ठेव दिली ती या ठिकाणीं असेल तर तिच्यावरूनही या प्रकरणाचा आणखी थोडा शोध खचित लागेल.

हर०:–बाबासाहेब, हीच पेटी आपण मजजवळ दिली ती !

चाण०:–भागुरायणा, घे ती पेटी इकडं ! (भागुरायण पेटी आणतो व देतो.) फोड ती पेटी. तींत काय आहे तें मला पाहिलंच पाहिजे. ( भागुरायण पेटी फोडतो, आणि आंतलें रक्षाबंधन व पत्र चाणक्याजवळ देतो. )

बाळि०:–चाणक्या, हें पहा चंद्रगुप्ताचं बाळपणचं रक्षाबंधन आणि कंकण. चंद्रगुप्ताच्या बाळपणची तसबीरही यांत आहे.

चाण०:–होय, तोच हा पाणीदार चेहरा. शंकाच नको. हें रक्षाबंधन चंद्रगुप्ताच्या हातांतल्या रक्षाबंधनासारखंच हुबेहूब आहे. भागुरायणा, त्या पत्रांत काय लिहिलं आहे तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. मोठ्यानं वाच.

भागु०:—ऐकावं महाराज (वाचतो.) " मित्रा चंदनदासा, मी युद्धाला निघालों. या युद्धांतून मी जिवंत परत येईन असं माझं मनच मला सांगत नाहीं. आणि मला जर या युद्धांत मृत्यु आला तर तो मला प्रियच आहे. तरुणपणच्या विकारवश मनाच्या स्थितींत माझी धर्म-पत्नी मुरादेवी इच्यावर मीं भलताच संशय घेऊन, तिच्या व माझ्या प्रेमवृक्षाचं सुंदर फळ—माझा अल्पवयी पुत्र बलनंद—याला वनांत नेऊन सोडण्याकरितां बळिरामाच्या स्वाधीन केला. दुष्टविकाराची लहर जाऊन शुद्धीवर आल्यावर मीं केलेला अन्याय मला कळून आला, आणि माझ्या पुत्राचा मी शोध करूं लागलों. पण बळिराम फिरून राजधानीला परत आला नाहीं. आणि पुत्राचा शोधही कुठं लागेना. या माझ्या घोर अपराधाचा उच्चार आजवर मीं कोणाहीपाशीं कधीं केला नाहीं. पण माझ्या मनाला आंतून नित्य टोंचणी लागून राहिली होती. आणि माझ्या राजसत्तेचा अकल्पित रीतीनं शेवट होणार असं भासूं लागतांच, हें माझ्या पापाचं याच जन्मांत मिळणारं प्रायश्चित्त असं वाटून, मृत्युमुखीं पडण्याच्या तयारीनंच मी युद्धाला जात आहें. मी तर चाललोंच; पण तूं माझा परममित्र, अत्यंत राजनिष्ठ प्रजाजन; तुला माझी शेवटची एवढीच विनंति आहे, कीं तुला जर माझ्या या पुत्राचा कधीं काळीं शोध लागला तर त्याला माझ्या पश्चात्तापाची हकीकत कळीव! आणि मला क्षमा कर म्हणून सांग. माझ्या पुत्राचं हें रक्षाबंधन आणि हें प्रतिमाचित्र जपून ठेव. त्याच्या शोधाला उपयोगीं पडेल."

बळि०:—अहाहा! नंदमहाराजांचे हे पश्चात्तापाचे उद्गार ऐकून माझा त्यांच्यावरचा सर्व राग एकदम गेला.

चाण०:—पण धननंदावर तुझा राग होता तो काय म्हणून?

बळि०:—कारण माझ्या आवडत्या बलनंदाला—म्हणजे चाणक्या, तुझ्या चंद्रगुप्ताला—म्हणजे तारिणी, तुझ्या चंद्रकांताला, अरण्यांत सोडून देण्याचा निश्चय त्यानं केला आणि तें क्रूर कर्म करायची मला आज्ञा केली म्हणून. माझंच नांव बळिराम.

चाण०:—तुझं नांव बळिराम! तुझा आवाज, तुझी मुद्रा माझ्या जुन्या ओळखीची दिसते.

बळि०:–होय. विष्णुगुप्ता, बाळपणच्या ओळखी विसरूं म्हटलं तरी विसरत नाहींत!

चंद्०:–कोण विष्णुगुप्त? हा काय योगायोग?

बळि०:–विष्णुगुप्ताची गांठ पडावी म्हणून तुला काल स्फूर्ति झाली होती ना? तीच ईश्वरानं आज सफळ केली दुसरं काय? विष्णुगुप्ता, हा चंदनदास तूं ओळखला नाहींस काय?

चाण०:–होय. मी कसा नाहीं ओळखणार? गुरुगृहीं आपण तिघेही विद्याभ्यास करीत होतों, त्याची मला आज एकदम सर्व आठवण झाली. स्मृतिरूप आरशावरचा मळ पुसला जाऊन, आपल्या बाळपणच्या चरित्राचं प्रतिबिंब मला आतां स्पष्ट दिसूं लागलं. खरोखर ईश्वराची लीला अगाध आहे. भागुरायणा, या सर्व बंदि-जनांच्या हातांतले पाश एकदम काढ. ये ये चंदनदासा, मला तुला आलिंगन देऊं दे आणि बळिरामा, तुलाही. [ ते आलिंगन देतात. ]

बळि०:–(हंसून) पण विष्णुगुप्ता, आपणां म्हाताऱ्यांचा हा आलिंगन-समारंभ मला वाटतं पुरे झाला. आपण या तरुणांकडं आधीं लक्ष दिलं पाहिजे, नव्हे का?

चाण०:–( चंद्रगुप्त तरवारीच्या मुठीवर डोकं टेकून सचिंत बसला आहे असं पाहून ) ऊठ चंद्रगुप्ता, ही खिन्नता आतां सोडून दे. तामसी-पणानं केलेल्या सर्व प्रतिज्ञा अशाच विफळ होतात; आणि त्या विफळ व्हाव्या हेंच योग्य. प्रथम–प्रतिज्ञेप्रमाणं नऊ नंदांचा संहार मला करितां आला, पण तेवढयानं माझं समाधान झालं नाहीं. दैवानं जिवंत राहिलेल्या हरनंदालाही मारावं अशी मला बुद्धि होऊन मीं तुझ्याकडून ही घोर प्रतिज्ञा करविली. पण हा अत्याचार ईश्वराला कसा आवडणार? मीं तुझ्याकडून जी प्रतिज्ञा करविली ती अशीच होती कीं शब्दशः तुझ्या हातून पार पडणं म्हणजे प्रत्यक्ष तुझाच घात होणं! आणि यांतच देवाचं म्हण किंवा दैवाचं म्हण, खरं चातुर्य दिसून येतं! चंद्रगुप्ता, तुझे प्राण मला माझ्या प्रतिज्ञेहून सहस्रशः प्रिय आहेत. फार काय, माझा सत्त्वनाश होऊन, मी मिथ्याप्रतिज्ञ ठरून, रौरव नरकाला गेलों तरी चिंता नाहीं. तुला सुखी पाहून मी तो नरकवासही सुखानं सोशीन. पितृवधाबद्दल

तूं दुःख करूं नको. त्याचं सर्व पातक माझ्या शिरावर आहे. तूं काय क्षत्रियकर्मच केलंस. मीं ब्राह्मणानं मात्र क्षमा—शांति विसरून युद्धाचा हा दावानल पेटविला ! चंद्रगुप्ता, आण तुझा हात. तुझ्या हातून अजाणतां झालेल्या पापक्षालनाकरितां मी माझ्या आजपर्यंतच्या सर्व पुण्याचं उदक तुझ्या हातावर सोडतों.

बाळि०:—पण विष्णुगुप्ता, एकट्या चंद्रगुप्ताच्या हातावर उदक सोडण्यापेक्षां आतां चंद्रगुप्त आणि तारिणी या दोघांचे हात एकमेकांच्या हातीं देऊन उदक सोडलेलं अधिक बरं. तूं आणि मी ब्रह्मचारी असलों तरी चंद्रगुप्त आणि तारिणी हीं तुला मला स्वतःच्या मुलामुलींसारखींच आहेत. चंदनदासाचं संसारसुख तेंच आपलंही.

चंद्र०:—( चंदनदासाला ) पण बाबासाहेब, आपला माझ्यावरचा राग गेला का ?

चंद०:—बाळा चंद्रकांता, कां नाहीं जाणार ? नंदवध होऊं नये तो झाला, आतां तो परत थोडाच येणार ? पण आजवर हरनंद हा एकटा नंदराजपुत्र माझ्या राजभक्तीला विषय होता, तो आणखी तूं एक झालास. खरोखर माझा आनंद आज द्विगुणित झाला ! चंद्रगुप्ता, तुझी कीर्ति त्रिखंड होवो असा मी तुला आशीर्वाद देतों.

हर०:—( पुढें येऊन ) धाकटा भाऊ होऊन वडील भावाकडून पुत्राप्रमाणं प्रेम करून घेण्याचा गोड अधिकार आज मला लाधला. मी किती तरी धन्य !

चंद्र०:—पण तारिणी ! मीं तुझ्याशीं कपट केलं त्याबद्दल्चा तुझा राग गेला का ?

तारि०:—(लाजून) बाबांनीं सांगितलं त्याहून मी तें अधिक काय सांगणार ?

चाण०:—( चंद्रगुप्ताच्या हातांत तारिणीचा हात देऊन ) अहाहा ! या राजनिष्ठ कुळाच्या राजभक्तीमुळंच हा सुखसोहळा आज पहायला सांपडला. केदारवनांत तपश्चर्येला जाण्याला आतां मात्र माझं मन कसं सुप्रसन्न झालं आहे ! [ पडदा पडतो. ]

## अंक तिसरा समाप्त.